






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



संपादक : प्र.ना. परांजपे
संपादन-सल्लागार : अशोक रा. केळकर, गं.ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण
संपादन-समिती : प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी
संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके : प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७
प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५
मुद्रण-स्थळ : भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे ५१.

प्रकाशन : त्रैमासिक; जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)
सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तसेच मैसूर येथील भारतीय भाषासंस्थान यांचेही अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन, तसेच भारतीय भाषासंस्थान सहमत असतीलच असे नाही.

या अंकाचे मूल्य रु. २५/-



## विंदा करंदीकर
## अभिनंदन : ज्ञानपीठ पुरस्कार - २००३

करंदीकर हे केशवसुत संप्रदायी कवी आहेत. समाजमनस्कता, पुरोगामी तत्त्वदृष्टी, आत्माविष्कार, प्रयोगशीलता, मुक्त अभिव्यक्ती ही केशवसुती संप्रदायाची खास वैशिष्ट्ये करंदीकरांच्या काव्यात ओतप्रोत आहेत. त्यांची वृत्ती स्वभावत:च आक्रमक आणि समाजाभिमुख आहे. जीवनावरील दृढनिष्ठा, साम्यवाद - विज्ञान - स्त्रीमुक्ती यांचा आग्रह धरणारा स्वभावधर्म यामुळे करंदीकरांची कविता व्यामिश्र झाली आहे. मराठी साहित्यक्षेत्रात कलावादाचे वर्चस्व असताना वरवर त्याच्याशी जुळवून घेत, पण आतून त्याहून भिन्न निर्मिती करंदीकर करीत राहिले. त्यांचे काव्यवाचन आवेशपूर्ण, आक्रमक आणि वक्तृत्वपूर्ण असते. त्यांच्या काव्याच्या रूपाने नवकाव्य समाजाच्या तळापर्यंत पोचले.

दै. सकाळ (दि. १५-१-०६)मधील डॉ. द.भि. कुलकर्णी यांच्या लेखावरून

---

अनुक्रमणिका

संपादकीय

# भाषेतील लिंगभेद

इंग्रजीतील 'सेक्स' व 'जेंडर' या दोन शब्दांना मराठीमध्ये 'लिंग' हा एकच प्रतिशब्द उपलब्ध आहे. त्यामुळे या शब्दाच्या दोन अर्थांमधील फरक मराठीमध्ये सांगावयाचा असल्यास आपल्याला 'प्राकृतिक' व 'व्याकरणिक' अशी विशेषणे वापरावी लागतात. इंग्रजीतील 'चेअरमन' व 'प्रेसिडेंट' या दोन शब्दांसाठीही मराठीत 'अध्यक्ष' हा एकच प्रतिशब्द उपलब्ध आहे. अशी इतरही बरीच उदाहरणे देता येतील. पण मुद्दा असा आहे, की सामाजिक व्यवहारात स्त्रियांवर होणारा अन्याय भाषेतही प्रतिबिंबित होत असतो आणि त्याची आपल्याला जाणीवही नसते. पण अशी 'सेक्सिस्ट' म्हणजे लिंगभेद करणारी भाषा बदलण्याचा प्रयत्न इंग्रजीने केव्हाच सुरू केला आहे. आता 'चेअरमन'ऐवजी 'चेअरपर्सन' असा शब्द वापरला जातो. महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी लिहिली जाणारी व्याकरणाची पाठ्यपुस्तके, पत्रकार व माध्यमकर्मींसाठी लिहिल्या जाणाऱ्या मार्गदर्शिका इ. सर्वांमधून लिंगभेदमुक्त भाषा वापरण्याचे धडे दिले जातात. 'ही' (=he)मध्ये 'शी'(she)चा समावेश होतो असे मानण्याचे दिवस मागे पडत आहेत. 'H(sh)e' असा उभयलिंगी प्रयोग करणे किंवा फक्त 'she'चाच उपयोग करणे रूढ होत आहे. पुरुषांच्या नावामागे 'मिस्टर'चा वापर करताना पुरुष विवाहित आहे की नाही हे सांगितले जात नाही. मग स्त्रीच्या बाबतीतच 'मिसेस' किंवा 'मिस' का ? म्हणून आता 'मिझ' (Ms.) !

मराठी भाषेतील लिंगव्यवस्था व्याकरणिक आहे, प्राकृतिक नाही. म्हणजे निर्जीव वस्तू निर्लिंगी असूनही मराठी भाषा तीन लिंगांतील कुठले तरी लिंग तिला बहाल करते. पण त्यातही 'सेक्सिस्ट' दृष्टी आहे असे काहींना वाटते. 'पर्वत', 'डोंगर', पुंलिंगी, पण 'टेकडी', स्त्रीलिंगी ! 'समुद्र', 'सागर' पुंलिंगी, पण 'नदी', 'पुळण' स्त्रीलिंगी ! 'माणूस' हा शब्द पुंलिंगी व नपुंसकलिंगी आहे, पण त्याचा बहुशः वापर होतो पुंलिंगी म्हणूनच. माणसांमधला सौहार्दसंबंध आपण 'बंधुभाव' या शब्दाने व्यक्त करतो; 'भगिनीभाव'ने नाही. एक काळ असा होता की स्त्रियांना पुरुषांवेगळे अस्तित्व आहे हेही भाषा मान्य करीत नसे. डॉक्टराची बायको 'डॉक्टरीण', वकिलाची बायको 'वकिलीण', मास्तराची बायको 'मास्तरीण'. पण या व अशा अनेक व्यवसायांत स्त्रिया शिरू लागल्या आणि मग काही काळ 'डॉक्टरीणबाई', 'वकिलीणबाई',

'मास्तरीणबाई', या स्वत: अनुक्रमे डॉक्टर, वकील, मास्तर आहेत की त्यांचे पती असा गोंधळ होऊ लागला. आता हे शब्द हळूहळू मागे पडत आहेत आणि व्यवसायविशिष्ट शब्द उभयलिंगी म्हणून रुळत आहेत. म्हणजे आता 'निर्मला डॉक्टर/वकील/अध्यक्ष आहे' असे म्हणणे स्वीकार्य ठरत आहे. पण स्त्री सभापतिपदावर असेल तर कोणता शब्द वापरावा असा प्रश्न पडतोच.

'स्त्रियांची भाषा' हा एक वेगळाच विषय आहे. त्याबद्दल संशोधन केले जाते, स्वतंत्र लेख लिहिले जातात; पण 'पुरुषांची भाषा' असा संशोधनप्रकल्प सहसा आढळत नाही. यातून पुरुषांची भाषा म्हणजे 'प्रमाण' भाषा असे गृहित धरले जाते व त्यातून संस्कृतीतील पुरुष-प्राधान्य सूचित होते असे म्हणता येईल.

पुरुष-प्रधान संस्कृतीमुळे भाषेतही पुरुष-प्राधान्य येते आणि पुरुषप्रधान (= लिंगभेदावर आधारलेल्या) भाषेमुळे नकळत्या बालवयापासून पुरुषप्राधान्य मनात रुजते. म्हणून समाजात व संस्कृतीत स्त्रीपुरुषसमानता निर्माण करायची असेल तर तिची एक सुरुवात भाषेला लिंगभेदमुक्त करण्यापासून होते असे म्हणता येईल. ■

प्र. ना. परांजपे

**सूचना फलक**

**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**


वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम, कलम 19 डी (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली 1956, नियम 8, नमुना 4, यांना अनुसरून 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यासंबंधीचे निवेदन.

१) **प्रकाशन स्थळ :** पुणे, महाराष्ट्र

२) **प्रकाशनाची कालनियतता :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

३) **मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय, पत्ता : 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. 5, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे 2.

४) **मुद्रणस्थळ :** भंडारी मुद्रणालय, हर्षल हाईट, आनंदनगर, सिंहगड रस्ता, पुणे 51.

५) **प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, पत्ता : कलम ३प्रमाणे

६) **संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** प्रभाकर नारायण परांजपे, भारतीय, पत्ता : सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.

७) **प्रकाशनाच्या मालकाचे नाव, पत्ता, एकंदर भागभांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्श्याचे भागीदार किंवा भागधारक व त्यांचे पत्ते :**

**मराठी अभ्यास परिषद :** 3, **अन्नपूर्णा,** 1259, **शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र.** 5, **पुणे** 411 002.

# भाषिक संवेदनशीलता

द. भि. कुलकर्णी

दैनंदिन व्यवहारात माणसं प्रमाण मराठीची मोडतोड करून बोलतात तेव्हा मला राग येत नाही की दुःखही होत नाही; गंमत वाटते, कधी कधी जीव सुखावतोसुद्धा.

कोल्हापूरला होतो तेव्हा तिथल्या मुली 'की' अव्यय इतक्यांदा वापरायच्या की त्यांच्या त्या बोलण्याला आम्ही 'की-लँग्वेज'च म्हणत असू; त्या 'जाऊ की', 'करू की'मुळे त्यांच्या बोलण्याला वेगळाच गोडवा येत असे. आई अंबाबाईच्या देवळातून घरी आली की म्हणायचीच, ''या दखणी बायका कशा झेलत झेलत बोलतात !'' ''अगं, तो कानडीचा परिणाम असेल.'' – मी. त्यावर ती म्हणायची, ''नाही रे ! यांचा स्वभावच गोड. देवळात भांडतात तेसुद्धा किती गोड वाटतं. 'बाजूला व्हा' असं नाही म्हणत; 'वाट द्या की ! वाट द्या की !' असं विनवतात.'' कोल्हापूरच्या अनुकरणाने मी एकदा नागपुरात प्रयोग करून पाहिला : एक अपरिचित बाई घरी आली; बायको घरी नव्हती. मी तिला म्हटलं, ''कोण आलं होतं म्हणून सांगायचं ?'' त्यावर ती रागाने नव्हे नेहमीच्या सवयीनेच कोरड्या स्वरात म्हणाली, ''काय म्हणून राहिला ?'' माझ्या डोक्यातला भाषिक पारा खाली आला आणि मी नाकाचा अजिबात वापर न करता म्हणालो, ''नाव काय तुमचं ?'' हे तिला बरोबर कळलं; दुसऱ्या उपप्रदेशात असं बोललो असतो तर मी गुर्कावतो आहे असं तिथल्या लोकांना वाटलं असतं ! कोकणात जादा सानुनासिक उच्चार तर विदर्भात अत्यल्प. भाषा म्हणजे शब्द - आणि - वाक्यच नाही तर हेल, आरोह-अवरोह, कंप, आघात; बोलणाऱ्याच्या मनाची मूससुद्धा. कवीची अनुभूती भाषांकित असावी असे आपण म्हणतो; ते खरेच असते; पण बोली बोलणाऱ्यांची अनुभूतीही भाषांकितच असते की. म्हणून तर ती अधिक मानसगोचर असते, हे आपण कुठे लक्षात घेतो ? व्यंकटेश माडगूळकर, जी.ए. कुलकर्णी यांच्या कथांतील बोली अनुभवाला किती आणि कशी मानसगोचर करते, हा अभ्यासाचा स्वतंत्र विषय आहे.

पण धड प्रमाण मराठी नाही, धड बोली नाही अशी मराठी मी ऐकतो तेव्हा मात्र मन खट्टू होते; तिथे आशयाकडे पुरेसे लक्ष देता येत नाही; मोडतोडीकडेच लक्ष द्यावे लागते. अशा भाषेला 'तोडभाषा'च म्हणायला हवे ! तिथे दोन भाषा किंवा अनेक भाषा आणि एक बोली या एकमेकींवर आक्रमण, अतिक्रमण करीत असतात. विभिन्न लिपी, विभिन्न धर्म, विभिन्न संस्कृती एकत्र येतात तेव्हा अशा तोडभाषा निर्माण झालेल्या दिसतात. त्यांना आपण चुकीने स्वतंत्र बोली, स्वतंत्र भाषा असे संबोधतो. यावर इलाज म्हणून (१) प्रमाण भाषा (२) उपभाषा (३) पोटभाषा (४) तोडभाषा (५) बोली (६) उपबोली (७) तोडबोली असे काही वर्गीकरण करता येते का ते पाहावे लागेल.

असे वर्गीकरण करण्याआधी बोलीच्या एका वैशिष्ट्यावर आपल्याला आपले लक्ष केंद्रित करावे लागेल : सहसा बोलीचा विचार प्रदेशसापेक्षतेने व समूह-सापेक्षतेने होतो; आणि त्यामुळे बोलीच्या एका मूलभूत वैशिष्ट्याकडे आपले दुर्लक्ष होते. ते वैशिष्ट्य म्हणजे, बोलीमध्ये गद्यभाषा आणि पद्यभाषा यांचे मूलाकार दडलेले असतात – नव्हे 'बोली' या मूलबीजातूनच गद्य आणि पद्य हे भाषाप्रकार उत्क्रांत होत असतात. गद्याचा विशेष आघातप्रधानता; पद्याचा विशेष प्रगत आवर्तनप्रधानता. हे दोन्ही विशेष बोलीमध्ये धूसरपणे एकवटलेले असतात; तोडभाषेत ते अनैसर्गिकपणे घुसलेले असतात. या विशेषांचे विभाजन आणि विकसन होऊनच तर गद्य आणि पद्य ही भाषारूपे सिद्ध होत असतात. बोली जनसामान्यांची अभिव्यक्ती आहे म्हणून ती मूल्यवान आहेच; पण ती गद्य-पद्याचा मूळ भाषिक स्रोत आहे म्हणून अधिक मोलवान आहे.

छंद:शास्त्रदृष्टचा बोली 'सुप्त मुक्तछंद-मुक्तशैली' आहे; भाषाशास्त्र-भाषाविज्ञानदृष्ट्या 'सुप्त पारिभाषिक गद्य' आहे – भलेही मग ती परिभाषा स्वयंपाक-घरातील किंवा वावरातील असो. ते ते शब्द त्या त्या जीवनक्षेत्रात पारिभाषिक संख्येइतकेच काटेकोरपणे वापरले जातात : तिथे 'ओगराळे' आणि 'चाटू' या दोन संज्ञांचे अर्थ अगदी वेगळे असतात. 'पातळ भाजी, वरण वगैरे वाढायचे भांडे ते ओगराळे'; 'माठातून पाणी काढायचे दांडीचे भांडे, मोठ्या बरणीतून लोणचे काढायचा लांब दांडीचा लाकडी डाव तो चाटू.' यातील अर्थसूक्ष्मता क्रियासूचक आहे : एका ठिकाणी 'अर्पण करणे, वाढणे' या क्रियेला महत्त्व आहे तर दुसऱ्या ठिकाणी 'घेणे', 'चटकन उचलणे' या क्रियेला महत्त्व आहे.

असे अगणित पारिभाषिक शब्द बोलीत असतात. त्यांच्याकडे आधी हळुवारपणे पाहावे लागेल व मग कोणत्या शास्त्रात कोणत्या स्वरूपात त्यांचे उपयोजन करायचे अशी शास्त्रकाट्याची कसोटी त्यांना लावावी लागेल – एरव्ही आघवी गोडी होईल



अनुक्रमणिका

मुकेयाबहिरेयाची ॥

दैनंदिन भाषिक व्यवहार करताना आपण पुरेसे हळुवार नसतो; समोरच्याला अर्थ कळला, आपला अभिप्राय कळला – झाले; अशी आपली काम चलावू वृत्ती असते. तिथे मन, कान-डोळे-तोंड, भाव-हावभाव यांना महत्त्वपूर्ण स्थान आहे हे आपण विसरूनच जातो – उलट ऐकताना-बोलताना चेहरा निर्विकार ठेवणे हे प्रतिष्ठेचे आणि फॅशनचे लक्षण मानू लागतो. अशा आवरक आणि अवरोधक वृत्तीने आपली भाषिक संवेदनशीलता क्षीण होते व मग अर्थ-नाद-मानसगोचरता यांना मान देणाऱ्या कलेपेक्षा भडक रंगरूपनाद यातून प्रकटणाऱ्या कृतक कला आपल्याला आवडू लागतात.

भाषा आणि भाषाधिष्ठित कलांच्याच बाबतीत नव्हे तर सर्वच शास्त्रांच्या आकलनात आणि निर्मितीत अशी संवेदनशीलता अपेक्षित असते – एरव्ही आपले आकलन माहितीच्या स्तरावर व तथाकथित निर्मिती अनुकृतीच्या स्तरावर राहते. भाषिक शास्त्रांच्या संदर्भात हे विशेषत्वाने खरे आहे. साहित्यशास्त्र, समीक्षा, शैलीविज्ञान, भाषांतरविद्या, तौलनिक साहित्याभ्यास इत्यादी क्षेत्रांत आपणास मौलिक कार्य करावयाचे असेल तर आकरग्रंथांचा पांक्त अभ्यास, अद्यावत विचारांचा मागोवा यांच्यासहच आपणांस आपली संवेदनशीलता वृद्धिंगत करावी लागेल – त्याविना आपला अभ्यासविषय असलेली भाषा आणि साहित्यकृती यांच्यातील अर्थस्पंदन-नादकंपन, अर्थनृत्य-नादनृत्य, नादार्थ विभ्रम आपणांस जाणवतीलच कसे ? त्यांचे निर्मितिभेद, त्यांचे प्रतीतिभेद उमजतीलच कसे ? ते जाणवले – उमगलेच नाहीत तर त्याबाबतचे पूर्वसूरींचे म्हणणे खरे की खोटे हे आपण ठरवणारच कसे ? केवळ तार्किक वा तात्त्विक सुसंगतीच्या आधारे ? छट् ! म्हणून तर भाषिक शास्त्रांना 'प्रतीतीची शास्त्रे' म्हणायचे. प्रतीती ही पहिली अट; तार्किक, तात्त्विक सुसंगती ही नंतरची अट. काव्यरसास्वादात आमच्यासारखे आम्हीच; तर्कदक्षतेबाबत आमच्यासारखे आम्हीच, असे एका साहित्यशास्त्रज्ञाने म्हटले तो त्याचा अहंकार नव्हता; ते त्याचे प्रतितिपूर्ण शास्त्रपूत उद्गार होते !

■

'डीएसके विश्व' 'वसुधा', ई-००४, ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे ४११०४१.
फोन : (०२०) २४३८०८९४







अनुक्रमणिका

# प्रकाश संत यांच्या कथांची भाषा

विनायक गंधे

प्रकाश संतांच्या कथासृष्टीत भाषा या घटकाला एक विशेष स्थान आहे. ती आशयसंपन्न आणि अर्थसमृद्ध आहे; ही भाषा बहुरूपिणी आहे. ती नादमयी आहे. लखलखत्या झुंबरासारखी आहे. व्यक्तिनुसार, प्रसंगानुसार, प्रदेशानुसार या भाषेने अनेक विभ्रम प्रकट केले आहेत. ही भाषा कुठेही प्रदर्शनीय होत नाही. अलंकारांचा सोसही तिला नाही, इतकी ती आशयात विरघळून गेली आहे.

या कथासृष्टीतील भाषेचा विचार करताना तिचे तीन ठळक विशेष जाणवतात. पहिला विशेष म्हणजे कानडीचा प्रभाव असलेली मराठी बोली. दुसरा विशेष म्हणजे मुलांची म्हणून असणारी भाषा. तिसरा विशेष म्हणजे लंपनची स्वतःची खास भाषा.

या कथांमधील कानडीचा प्रभाव असलेल्या मराठीचे विशेष प्रथम लक्षात घेऊ. कानडी ढंगाचे मराठी आजवर मराठी साहित्यात बऱ्याचदा प्रकट झाले आहे. विशेषतः मराठी नाटकांमध्ये कानडी चालीचे मराठी बोलणारी पात्रे योजण्याची एक टूम होती. प्रेक्षकांचे मनोरंजन व्हावे अशा उद्देशानेच या पात्रांची योजना केली जाते. आजवर मराठी ललित साहित्यात कानडीचा प्रभाव असलेलं मराठी अवतरले खरे, पण गंभीर आशय व्यक्त करण्याचा हेतू त्यात नव्हता. पु.ल.देशपांडे यांचा अपवाद वगळता कानडीयुक्त मराठीचा सहजसुंदर आविष्कार आजवर कोणा मराठी लेखकाने केलेला दिसत नाही.

प्रकाश संतांनी केवळ गमतीदार अभिव्यक्ती म्हणून सीमाप्रदेशातील बोलीचा वापर केला नाही. ही बोली विलक्षण अर्थवाही आहे. सीमा प्रदेशातील माणसांच्या विविध भावना व्यक्त करण्याचे सामर्थ्य तिच्यात आहे. सीमा प्रदेशातील माणसांचे कानडी चाल लावलेले मराठी, त्यातील आर्जव, लाघव, चैतन्यशीलता आणि खमंगपणा या विशेषांसह प्रथमच एवढ्या मोठ्या प्रमाणात या कथासृष्टीतून व्यक्त झाले आहे. सीमा भागातील माणसे एकमेकांचे शब्द घेतात; वाक्यरचना घेतात, त्यांचे परस्परांशी अर्थपूर्ण संवाद घडतात. ग्रांथिक मराठीपेक्षा या मराठीची रूपे वेगळी आहेत. ग्रांथिक

आहे ते. नुसतं शोभेचं मेषमात्र असं आमची आई म्हणते.''

'सोड' हे सहाय्यक क्रियापद या बोलीत मोठ्या प्रमाणात येते. या क्रियापदाचा वैविध्यपूर्ण उपयोग होतो. खाऊन घे. बोलून घे असे आपण बोलतो, तसा 'सोड' या क्रियापदाचा या बोलीत सार्वत्रिक वापर होतो. 'नाणं' या कथेतील पत्ता शोधणारा पाहुणा म्हणतो. ''तेच की हो सांगायलोय मीऽऽ मागच्या दोन्ही गल्ल्या पालथ्या घालून सोडलो बगा मी... मगापासनं फिरायलोय. तेवडं सांगून सोडा.'' निंबरगी मामी म्हणतात, ''आदी जावा आणि कंम्प्लेट करून सोडा. च्यांगलं दोन तोळ्याचं चेन आहे म्हणून सोडा.'' हंडग्याच्या बॅटबद्दल एक पोरगा अभिमानाने म्हणतो : ''तुझ्यासारखा काडीपैलवान ब्याटच्या वजनानं च्यारदा तरी खाली पडून सोडणार घे.'' लंपनला मारणाऱ्या पोराला दम देताना यमज्या म्हणतो. ''रस्त्यावर नाक घासून सोड. नाईतर आणि धा हाणतो बग आता.'' 'सोड' या क्रियापदाचा असा सार्वत्रिक वापर आहे.

वरवर क्रियापदाची भूतकाळी रूपे वाटतात पण प्रत्यक्षात बऱ्याचदा ती वर्तमानकाळी रूपे असतात. 'चक्र' या कथेतील परळ्या लंपनला म्हणतो. ''लंप्या, कणब्या तुला हुडकायलंय बघ तिकडं. त्याची चड्डीची दोन्ही बटणे तुटली म्हणे. चड्डी बांधायला सुतळी मागायलाय बघ तो.'' एक मित्र दुसऱ्याला म्हणतो, ''भांग आगगाडीच्या रुळांसारका बेष्ट पाडलास घे, त्यावरूनच वळकायलंय''. वरील उदाहरणांत 'हुडकायलंय', 'मागायलाय' आणि 'वळकायलंय' अशी क्रियापदाची कर्त्याच्या लिंगवचनानुसार वर्तमानाची किंवा भूतकाळाची रूपे येतात. क्रियापदाची आणखी वेगळ्या प्रकारची भूतकळी रूपे या बोलीत येतात. 'रानी का बाग' या कथेत लंपन म्हणतो. ''पण ते कधी मला जमायला नाही.'' किंवा 'परचक्र' कथेत तो म्हणतो. ''पाय अजिबात दुखायला नाही. ते यायला नाहीत किंवा त्यातल्या सगळ्या गोष्टी काही उचलून आणायला नाहीत.'' वरील वाक्यांतून 'जमायला', 'दुखायला', 'यायला', 'आणायला' अशी धातूची भूतकाळी रूपे येतात. ती अनुक्रमे जमले, दुखले, आले, आणल्या या क्रियापदांची रूपे आहेत.

सीमाप्रदेशातील या बोलीत कृदन्तांचा भरपूर वापर होतो. उदा० शिवलीला म्हणते, ''लंपू, माझं नाव छबूताई निकमची मैत्रीण असं नसलेलं म्हटलं, माझं नाव शिवलीला असलेलं.'' या बोलीभाषेत कृदन्तांचा आणखी एक मजेशीर उपयोग होताना दिसतो. वर्तमानकाळाच्या अर्थासाठी भविष्यकालीन धातूसाधित येते. कासारगोड आपल्या गिऱ्हाइकांबद्दल तक्रार करताना म्हणतो, ''हाच गिराईक आता सायकल पुन्हा खडकाळ रस्त्यानं नेणार, मग पुन्हा पंचर झाल्यावर हिकडे येऊन गुरकणार.'' सोंड्या

भाषेचा औपचारिकपणा या बोलीत नाही. ही बोली मोकळीढाकळी आणि अनौपचारिक आहे. तिच्यात आवाहनक्षमता आहे. या बोलीतून प्रकट होणारी जवळीक हृद्य आहे. व्याकरणाचे विधिनिषेध या बोलीला नाहीत. मराठीतील कर्मणी प्रयोगातील कर्त्याला प्रत्यय लागतात. या बोलीतील कर्मणी प्रयोगातील कर्त्याला प्रत्यय लागत नाहीत. उदा० 'लंप्याचा गामा पैलवान कांदा पकडला' किंवा 'झोपडी कोण बांधला'? वंटमुरीकर देसाई आपल्या बोक्याबद्दल म्हणतात, ''काय दिसलं की हा खाल्लाच.'' या बोलीतील कर्मणी प्रयोगातील कर्ता प्रथमेत असतो. याच्या उलट गरज नसताना कर्तरी प्रयोगात कर्त्याला विभक्तीचा प्रत्यय लावला जातो. उदा० परवा सकाळी त्यांनी उठले. (ते उठले, असे हवे) किंवा त्यांनी म्हणतील तसं करायचं. (येथे कर्ता 'ते' असा प्रथमेत हवा होता.) सुंदर पिच खराब का करतात ? या वज्रमट्ट्याला पडलेल्या प्रश्नाला यमज्यानं दिलेलं मासलेवाइक उत्तर पाहा. ''तुजं काका तुला एक बेस्ट प्यांट शिवलं तर्मग ते घाणगिण होईल म्हणून तू काय कर्णार रे ? नुसतं कमरेला करदोटा बांधून ऱ्हाणार काय ?'' या उताऱ्यातही कर्मणी प्रयोग असून कर्ता प्रत्यरहित आहे. शिवाय यातील प्रश्नार्थकता ऐकणाऱ्याला निरुत्तर करणारी आहे. या बोलीला एक खरपूसपणा आहे.

'लिंगघोटाळा' हा या बोलीचा विशेष आहे. या बोलीत पुल्लिंगी शब्द नपुसकलिंगी होतात, स्त्रीलिंगी पुल्लिंगी होतात. बऱ्याचवेळा व्यक्तींचा नपुसकलिंगी उल्लेख होतो. वंटमुरीकर देसाई आपल्या बोक्याबद्दल तक्रार करताना म्हणतात, ''ते आमचं एक पूर्वज व्यंकटराव म्हणायचं त्यांना एक असंच सर्व खाऊन कर्ज करून मेले ते सोडा.'' लंपनचा मित्र खंडागळे कटिंग कशी करायचे ते सांगतो. ''माझा धाकटा भाऊ एकदा गेलेला तर खंटूने त्याच्या मानेवर मिशीन ठेवला ती एका पेट्टात भुईपात्तर नेला तो रस्ताच तयार केला बग ते.'' येथे मशीन शब्द पुल्लिंगी वापरला आहे. शिवाय त्याने रस्ता तयार केला, अशा कर्मणी प्रयोगाऐवजी 'ते रस्ताच तयार केलं बग' असे गमतीदार वाक्य येते. लंपनचे मित्र 'मन्याशेठ कायम अभ्यास करतंय' असं म्हणतात. मुलं हवळ पेंटरबद्दल म्हणतात, ''तो मॅड हवळ पेंटर काडला बगा हे चित्र. सारकं चित्रंच काढत असतंय बगा ते... कोळसा घेतंय चित्र काढतंय. विटेचा तुकडा घेतंय चित्र काढतंय, आनी काय घेतंय चित्र काढतंय. बेरकी हाय हं कायम ते.'' या भाषेत बऱ्याच वेळा एखाद्या पुरुषाचा, मुलाचा उल्लेख नपुसंकलिंगी येतो. या कथासृष्टीतील मुले एकमेकांचा उल्लेख नपुसकलिंगी करताना दिसतात. उदा० 'हंपायरनं बोट वर करायच्या आधीच पांड्या ओरडलासुद्धा ''ककम्या मेलं !'' किंवा बाळासाहेबानं मुक्या स्कोअररबद्दल सांगितलं, ''ते काय करतंय, नुसतं खातंय आणि हिंडतंय, बिनकामाचं

खंडागळेबद्दल म्हणतो, ''काढलेलं सोनं सराफाला विकणार, पैसे पेटीत ठेवणार, मोठीच्या मोठी लाकडी पेटी ठेवलंय बग ते दुकानाच्या खोलीत.'' कमळीबद्दल सांगितलं जातं, ''कमळी कष्ट उपसणार एक नंबर असणार.'' 'कुलुप' या कथेत अशी रचना आहे : ''वट्टात काय, गल्लीतल्या पोरांचा जमाव कायम त्या इमारतीच्या कंपाउंडच्या आसपास. कायम इमारतीचं निरीक्षण चालणार म्हणजे चालणारच.''

कानडीच्या प्रभावाच्या सर्वसामान्य लकबी या बोलीभाषेत आहेतच. या भाषेत 'एक' या संख्यावाचक विशेषणाऐवजी 'एकटा' असा शब्द येतो. मराठीत एकजण असे म्हणावयाचे असेल तेव्हा या भागातील माणसे 'एकटा' असा शब्द वापरतात. 'पॅच' कथेतील कासारगोड म्हणतो, ''गेल्या महिन्यात एकटा घंटी पळविला. दुसरा स्टँड काढून घेतला.'' किंवा 'परेड' या कथेत लंपन म्हणतो, ''त्यातलं एकटं पोरगं माझ्याकडं पाहून ओरडलं.''

मराठीच्या मध्यवर्ती बोलीत जेवणबिवण, काडीबिडी, शाळाबिळा असे अंशाभ्यस्त शब्द येतात. यातील बिवण, बिडी, बिळा हे शब्द पूरक असतात. त्यांना स्वतंत्र अर्थ नसतो. अशा अंशाभ्यस्त शब्दासाठी 'बि' या अक्षराचा उपयोग होतो. कानडी भाषेचा प्रभाव असलेल्या मराठीत 'बि'ऐवजी 'गि' अक्षर वापरून अंशाभ्यस्त शब्द तयार करतात. भाषेच्या या विशेषामुळे कानडी बोलणारी व्यक्ती लगेच समजते. उदा० रुद्राप हिरेमठ म्हणतो, ''बसा गिसा काय नाही, हे आमचं मोटार मुहुर्तालाच स्टार्ट झालंय. ते स्टार्ट आहे तोप्रंत जायचं बघूया. बंद-गिंद पडलं तर मग हँडल मारमारून मोटार स्टार्ट करायचं म्हणजे मग आणखीन लेट होनार. च्यला बसून सोडा.''

मुलांची म्हणून एक भाषा असते. त्यांचे खास जग त्यातून प्रकट होते. ही भाषा बाल्यभाव प्रकट करते. निरागस क्रीडाशील शैशव त्यातून प्रकट होते. मराठी बालकवितेचा अपवाद केल्यास कथाकादंबऱ्यांतून लहान मुलांच्या खास भाषेचा उपयोग कमी झालेला आहे. मराठी गद्य साहित्यात, विशेषत: कथेच्या क्षेत्रात, मुलांची भाषा एवढ्या मोठ्या प्रमाणात आणि सातत्यपूर्वक पहिल्यांदाच प्रकाश संत यांच्या कथांतून प्रकट झाली आहे असे म्हणावे लागेल.

संख्येतून अभिव्यक्ती करणे, नादमय शब्दांचे आकर्षण, शब्दांच्या करामती, वेगवेगळे मंत्र, चिडविण्याची भाषा या लहान मुलांच्या भाषेच्या सार्वत्रिक प्रवृत्ती आहेत. लंपनच्या भावविश्वात या वृत्ती पुन:पुन्हा प्रकटतात. मुले बऱ्याच वेळा संख्येच्या म्हणजे आकड्यांच्या भाषेत बोलतात. आपल्या भावना अधिक उत्कटपणे आणि भरघोसपणे व्यक्त करण्यासाठी त्यांना आकडे मदत करतात. या कथासृष्टीचा नायक लंपन बऱ्याचवेळा आपल्या भावना संख्येचा वापर करून व्यक्त करतो. 'फुलाची गोष्ट' या

कथेत घरातील प्रसन्न वातावरणामुळे निर्माण झालेला आनंद लंपनने असा व्यक्त केला आहे. ''असं वाटत होतं, सर्व घरात एकोणीस गुणिले एकोणीस गुणिले एकोणीस गुणिले एकोणीस फुलं पसरली आहेत.'' 'चक्र' या कथेतील मुली जवळ आल्यानंतर लंपनला एकवीस वेगवेगळ्या फुलांचे वास यायला लागतात. येथे लंपनला कितीतरी किंवा खूप असे म्हणावयाचे आहे. त्यातील वैविध्य सांगावयाचे आहे. 'शर्यत' या कथेमध्ये गावाला जाताना आजी लंपनला एक हजार त्र्याऐंशी सूचना करते. म्हणजे नको इतक्या बारीक सारीक सूचना करते. 'अर्थ' या कथेत लंपन म्हणतो, ''या कोठीच्या खोलीत आम्ही दोन हजार दोनशे तास बसलो आहोत. तरी बाहेर आज्जीचं तोंड चालू आहे.'' आपण कितीतरी वेळ कंटाळून बसलो आहोत, हे यातून लंपनला सांगावयाचे आहे. आपला दीर्घ कंटाळा त्याने या मोठ्या संख्येतून व्यक्त केला आहे. काही वेळा आपली अगतिकताही लंपन संख्येतून व्यक्त करतो. तो म्हणतो, ''मी आज्जीला तेवीस वेळा म्हणालो की मला इथं राहायचं नाही.'' आपल्या आनंदाच्या व दु:खाच्याही सर्व भावच्छटा लंपनने संख्या वापरून व्यक्त केल्या आहेत. लंपनचे जाणिवांचे क्षेत्र विस्तारत गेले तसे पुढे पुढे एखाद्या संख्येतून अभिव्यक्ती करण्याची त्याची लकब कमी झालेली दिसते.

मुलांना शब्दांशी खेळायला आवडते. 'अडगुलं मडगुलं सोन्याचं कडगुलं' यातील नाद मुलांना आकर्षित करतो. शब्दातील अक्षरांचा क्रम उलटा करायचा, त्यातून गमतीदार शब्द निर्माण करायचे, याची मुलांना आवड असते. लंपन आणि त्याचे मित्र अक्षरांचा क्रम बदलून गमती करतात. अक्षरे फिरवून त्यांची वेगळी रचना करायला मुलांना आवडते. लंपनला तर शब्दांशी खेळण्याची फार हौस आहे. दोड्ड गौडर च्यॉल हे शब्द तो च्यॉल गौडर दोड्ड असे म्हणतो. हिंडलगेकर अण्णांचे तो अण्णा गेकर – हिंडल असे रूप करतो. किंवा 'सुळढाळ' या शब्दाचा ढाळसूळ असा उच्चार करतो. काशाने आपल्या जवळ बसणाऱ्या सगळ्या मित्रांच्या नावातील पहिले अक्षर घेऊन परमेश्वराचा एक आदेशच तयार केला होता. माणक्या, रवळनाथ, तिप्पणा लाट्या, लंपन आणि काशिनाथ देशपांडे या नावातील पहिली अक्षरे घेतल्यावर 'मारतीला लंका दे' असा आदेश त्याने तयार केला. अर्थात हा आदेश रावणाला होता. 'नकादु' हे संतांच्या एका कथेचे शीर्षक आहे. ते बालसुलभ प्रवृत्तीवर प्रकाश टाकणारे आहे. काशा कोडे घातल्यासारखे एक वाक्य उच्चारतो. आणि इतर मुलांना त्याचा अर्थ विचारतो. ''नकादुचेण्यापकासके'' म्हणजे काय ? मुले खूप डोके खाजवतात. पण उत्तर सापडत नाही. मग तोच सांगतो. ''उलट वाचा ''केस कापण्याचे दुकान'' मग वाक्ये उलट करण्याचा मुलांना चाळाच लागतो. लंपन घरी येऊन आजीआजोबांना

शब्दांची कोडी घालतो. वेगवेगळ्या गोष्टी मिळाव्यात म्हणून मुले मंत्र म्हणतात. हे मंत्र मोठे नादमय असतात. त्यातील शब्द निरर्थक पण नाद श्रवणीय असतात. लंपनच्या घरी आलेल्या बंक्याने विटीदांडूच्या खेळातला, एक अफलातून मंत्र दिला आणि मोठ्या आवाजात साग्रसंगीत म्हणून दाखविला. ''पाऽऽव चिट्टी निट्टी घोऽऽ डा फू ऽऽ क डोळाझिल'' अशा पद्धतीने बंक्याने म्हटलेला हा मंत्र पोरांना खूप आवडला. विटीदांडू खेळताना उंच आवाजात पोरं हा मंत्र म्हणू लागली. गोट्यांच्या डावासाठी बंक्यानं असाच आणखी एक मंत्र दिला. कुणी कोणाची गोटी मारली तर एकदम तो दहा पायऱ्या वर. मग हा मंत्र म्हणायचा. ''पंचापांडू - सह्यादांडू - सप्तपोतडे - अष्ट जिंकिले - नऊनऊ किल्ले दश्श्यापेडा - अकलकराठा - बाळूमराठा. तिरंगी सोटा - चौदा लंगोटा - पंधराशी पारिवळ - सोळी घारिवल - सतरम सीते - अठरम गरूडे - एकोणीस च्यकच्यक - वीसा पकपक - एकवीस कात्री - बावीस रात्री - तेवीस त्रिकामफूल -चोवीस चोर - पंचवीस मोर'' या मंत्रांनी पोरांच्या समोर एक जादूची गुहाच उघडली. चारपाच पोरं कुठंही खेळायला लागली की हा मंत्रजागर सुरू व्हायचा. पोरांना या मंत्रांनी वेड लावलं. पोरांच्या या मोठ्याने म्हटल्या जाणाऱ्या मंत्रांनी मोठ्या मोठ्या माणसांची डोकी उठायला लागली.

मुलं एकमेकांना चिडवितात ती भाषाही मजेशीर असते. मुलांना शब्दांच्या नादांचे सदैव आकर्षण असते. उदा० ''काय बे चंब्या, कुठाय तांब्या ?'' किंवा यम.टी.कुलकर्णी म्हणाला, ''काय पीजा म्हणे ? आमटी, बायको तुझी भामटी'' किंवा ''गनिमी कावा, लपत जावा.'' एकमेकांना चिडविण्यासाठी मुले शाब्दिक करामती करतात. लंपनला अशा करामती करण्याची लहर येते. 'आदम' कथेमध्ये बाबांची गंमत केल्यानंतर जी हसून हसून पुरेवाट होते; त्याबद्दल लंपन म्हणतो, ''आम्ही सगळे हसून हसून बेजार - ठार - पापडखार.''

मुलांच्या भाषेचे सर्व विशेष लंपनच्या भाषेत आहेतच; याशिवाय लंपनची स्वत:ची वेगळी शब्दसृष्टी आहे आणि भाषा आहे. 'हुचमॅड' हा शब्द लंपनचे मित्र वापरतात; पण लंपन अनेकदा वापरतो त्या 'मॅड' शब्दाला संदर्भानुसार अनेक अर्थ प्राप्त होतात. लंपनच्या बोलण्यात हा शब्द सदैव येतो. 'मॅड' हा शब्द 'बहुरूपी' आहे. 'मॅड' हा शब्द लंपनच्या अभिव्यक्तीचा आणि त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा खास विशेष ठरला आहे. लंपनच्या भावविश्वात 'मॅड' हा शब्द वेगवेगळे भाव कसे निर्माण करतो हे पाहणे मोठे मनोरंजक आहे. सुमीच्या आजोबांबद्दल लंपन म्हणतो, ''सुमीच्या आजोबांचा आवडता विषय म्हणजे भूगोल. मॅडच आहेत झालं.'' मुलांना उंटावरून फेऱ्या मारणाऱ्या उंटवाल्याला लंपन मॅड म्हणतो. तेव्हा त्याच्या मनात उंटवाल्याबद्दल कौतुक

असते. हेडमास्तरांच्या हातातील छडी मॅड असते म्हणजे दुष्ट असते. आमची सगळी साखळीच मॅड आहे, असे जेव्हा लंपन आपल्या मित्रांबद्दल म्हणतो तेव्हा त्याच्या मनात सगळ्या मित्रांबद्दल कौतुक असते. लंपनचे जाणिवांचे विश्व बदलते, वाढत जाते. पण त्याचे मॅड शब्दाचे वेड काही कमी होत नाही. उदा० 'मला मॅडसारखं छानच वाटायला लागलेलं,' किंवा 'एवढ्यात घंटा मॅडसारखी वाजली' असं लंपन म्हणतो. कासारगोडच्या दुकानाला तो कासारगोडचं मॅड सायकलचं दुकान असं म्हणतो. 'आजोबांना मॅडसारखी एक लोखंडी पट्टी हवी होती,' असे सहज म्हणून जातो. 'मॅड' हा शब्द लंपनच्या अभिव्यक्तीचा एक अपरिहार्य भाग बनला आहे. तो ज्याचे विशेषण बनून येतो त्यानुसार रंग धारण करतो.

'सणसणीत' हा लंपनचा आणखी एक आवडता शब्द. हा शब्दही संदर्भानुसार वेगवेगळी रूपे धारण करतो. एका व्यक्तीचे वर्णन करताना लंपन म्हणतो, ''सिग्रेटच्या मागच्या बाजूला सणसणीत मिशा !'' (भरघोस, भरदार) ''पण मला सणसणीत समजलंच ती काय विचारणार ते'' (चांगलंच किंवा पूर्णपणे) 'सणसणीत' शब्दाच्या वेगवेगळ्या छटा लंपनच्या वाक्यातून बारकाईने व्यक्त झाल्या आहेत. ''मी सणसणीत मान हलवली'' (= अगदी पूर्ण). ''घसरण्याचे प्रताप पोरांच्या चड्ड्यांवर सणसणीत दिसणार'' (= स्पष्ट). ''त्यानंतर मास्तर म्हणतात तसं आमचं दळणवळण सुरू म्हणजे सुरूच सणसणीत.'' (= अव्याहत). ''खोलीत अमृतांजनाचा वास सणसणीत भरून राहिलेला'' (= अगदी उग्र). ''तो पोरगा तिरळा होता सणसणीत.'' (= पूर्णपणे). ''तक्क्याला टेकून बसल्यावर सणसणीत लक्षात आलं की समाधानाचा सुस्कारा की काय म्हणतात तो सोडणं अशक्य.'' (= चांगलंच). 'सणसणीत' असा शब्द वापरल्यामुळे लंपनच्या मनातील अर्थ द्विगुणित होतो.

'तंतोतंत' हा लंपनचा शब्द म्हटला तर अर्थपूर्ण, म्हटला तर निरर्थक. लंपनला हा शब्द वापरायची विलक्षण हौस. प्रौढपणाचा आव आणून लंपन हा शब्द अनेक ठिकाणी वापरतो. 'तंतोतंत' या शब्दातून त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रौढपणा मजेदारपणे व्यक्त झाला आहे. उदा० (१) आज्जी म्हणालेली, ते बरोबरच तंतोतंत. (२) माझ्या शेजारीच मॅच पाहात उभ्या असलेल्या चंब्याला वाटणार तो बावळट पोरगा म्हणजे लंप्याच ! तंतोतंत. (३) आजीचा पट्टा म्हणजे बोलायचं कामच नाही. पोरं ठारच. तंतोतत जीव जाऊन. (४) ग्राउंडने पिच खाल्ला सोड, असं अळप्या म्हणाला ते एकदम बरोबरच, तंतोतंत. (५) सोंड्या म्हणाला ते बरोबर. आम्ही आता सावकारांच्या गँगचेच झाल्यासारखे तंतोतंत.

लंपन त्याच्या वाचनात आलेल्या पुस्तकांतील पुस्तकी प्रौढ भाषेचा जो जो वापर

करतो तो तो ती अधिक रोचक बनते. लंपन गंभीरपणे बोलतो, पण ऐकणाऱ्याला किंवा वाचणाऱ्याला हसू येते. लंपन गांभीर्याचा आव आणतो खरा; पण त्या शब्दांमागील मिस्किल लंपनच जाणवतो. उदा० ''आणि ज्या खोल्यात उजेड जास्त आहे त्या उजेडात इतर कुठल्याही ठिकाणचा अंधार जास्तच स्पष्ट दिसणार, सूर्यप्रकाशाइतका म्हणायला देखील वाव आहे. त्या खड्ड्याचं काय झालेलं हे बघण्यासाठी आमचा जीव चाललेला म्हणायला संपूर्ण वाव आहे.'' या उदाहरणात खरे तर मुलांना खड्ड्यात काय चाललंय हे बघण्याची अतोनात उत्सुकता होती. पण लंपनने ही उत्सुकता व्यक्त केली आहे ती पुस्तकी भारदस्तपणाने. '' 'बोंबला' असं त्यांनी सांगितल्यावर तोंडाकडं हात नेणारे काही बहाद्दरही आमच्या टोळीत आले होते. ही अगदी दगडावरची रेघ. संपूर्ण सत्य.'' वाचनात लिखित भाषेच्या लकबी आणि समृद्ध शब्दसंपत्ती लंपन वापरून पाहतो. त्यामुळे भाषा आत्मसात करण्याची त्याच्यात घडत असलेली प्रक्रियाच वाचकाच्या प्रत्ययाला येते.

लंपनच्या भाषेचे आणखी काही विशेष आहेत. आपली अभिव्यक्ती अधिक ठाम व जोरकस करण्यासाठी लंपन क्रियापदाची द्विरुक्ती करतो. उदा० ''त्या वेळी अळण्या जो पडला तो पडला'' म्हणजे चांगलाच जोरदार पडला. किंवा ''टुकण्याला गप्प करताना आमचं जे झालं ते झालं'' म्हणजे टुकण्याला गप्प करणे इतके अवघड गेले, सांगून सोय नाही. एके ठिकाणी लंपन सांगतो, ''मास्तरांच्याकडून आम्हाला जो मार बसला तो बसला.'' म्हणजे भरपूर मार बसला.

'नीटच' हा लंपनचा एक आवडता शब्द. तो अनेकदा वापरून लंपन आपले वेगळेपण प्रकट करतो. उदा० (१) रात्रीच्या वेळी शेतातले मोठे बेडूक पॉप-पॉप-पॉप असं का म्हणत असतात तेही नीटच समजले मला. (२) मी त्या पोराकडे नीटच पाहिलं. (३) आजोबा म्हणाले ते अर्धंच बरोबर होतं. त्याची दुसरी बाजू मला नीटच समजलेली. (४) पण तिला आनंद झाला होता तेवढं नीटच समजलं. (५) प्रत्येक दुकानाचा स्वभाव वेगळा असतो की काय असं वाटायला लागलं. मला ते नीटच समजायला लागलं. ('नीट' शब्दाला 'च' पूरक जोडल्यामुळे लंपनचा आत्मविश्वास यातून प्रकट झाला आहे.

लंपनची प्रश्नार्थक शैली पण लक्षणीय आहे. लंपनला एखाद्या घटनेबद्दल आणि व्यक्तीबद्दलही, काही वेळा स्वत:बद्दलही अनेक प्रश्न पडतात. एखाद्या गोष्टीबद्दलचे अनेक पर्याय त्याच्यासमोर येतात. लंपन हे पर्याय उपस्थित करतो आणि त्याचे उत्तर न देता आपल्यासारख्या श्रोत्यांवर तो ते सोपवितो. उदा० सुरुवातीला खूप त्रास दिलेल्या जंब्या नावाच्या थोराड मित्राबद्दल लंपन म्हणतो, ''जंब्याच्या आणि माझ्या

मैत्रीची वेल ? फुलांची की काट्यांची ?'' दुसऱ्या ठिकाणी ''प्रत्येक बिट्ट्या पोरात मी? की माझ्यात बिट्टा पोरगा ? जे काय असेल ते'' असे म्हणून दोन्ही पर्याय सांगतो. ''आज्जीच्या हातात मी ठेवलेली ती नाणीच होती की निखारे ?'' असे म्हणून एका दाहक अनुभवाचे सूचन करतो. आपल्या प्रश्नार्थक शैलीने लंपन सुंदर पर्याय देतो. आणि श्रोत्यांच्या कल्पनाशक्तीवर ते सोडून देतो. उदा० ''बाहेर सगळी सृष्टी की काय ती भिजायलेली ? आणि आम्ही कोरडे ? की कोरडे पाषाण ? की मास्तर म्हणतात तसे पालथे घडे ? म्हणीतले ? पाण्याची आम्हाला एवढी भीती का म्हणून? जे काय असेल ते.'' या प्रश्नार्थक शैलीने लंपनचे कथन अनेक संदर्भसूचक होते.

लंपनच्या (पर्यायाने प्रकाश संत यांच्या) आशयघन भाषेचा विचार तिच्यातील प्रतिमासृष्टी आणि चित्रमयता यांचा विचार केल्याशिवाय पूर्ण होणार नाही. संतांच्या कथेतील प्रतिमा लखलखीत आहेत, वास्तव आहेत, आशयाशी विलक्षण एकरूप झालेल्या आहेत. त्या कथासृष्टीतील प्रतिमा लंपनच्याच भावविश्वातून साकार झाल्या आहेत. काही प्रतिमा पाहा :

(१) ती (सुमी) सरस्वतीचा जप करत होती. त्याचा सारखा सूस् असा निखारे विझवल्यासारखा आवाज येत होता. (२) लोकर सोडवताना लोकरीचा गुंडा जमिनीवर गडगडा फिरतोय हिकडे - तिकडे तसं तो बोलत होता. (पंखा) (३) गल्लीतल्या बाकीच्या बायका आपापल्या पोरांना आणि पोरींना वरवंट्यानं चटणी वाटल्यासारख्या हाका मारायच्या. (नाणं) (४) पिशवीतून तांदूळ सांडतात तसं पोरं हसत होती. (नकादु) (५) पेल्यातून पाणी पिणाऱ्या काचेच्या शहामृगासारखं माझं नाक दर पाच मिनिटांनी माझ्या मनगटाकडं जात होतं आणि मी तो अत्तराचा वास मॅडसारखा माझ्या नाकात भरून घेत होतो. (झांज) (६) तो सराफबी कुंपणासारखा माजलाय बेटा. (नकादु) (७) त्याचं डोकं झाडावरून पाहिलं तर काळ्या पडलेल्या केळीच्या पानासारखं दिसत असणार. (झुंबर) (८) अगदीच माळ्यावर चरणाऱ्या मेंढ्यांच्या कळपाप्रमाणं खालीवर आवाज नकोत. (झुंबर) (९) यमज्याचा आवाज आगगाडीचे दोन डबे एकमेकांवर आपटल्यावर येईल असला होता. (रानी का बाग) (१०) प्रत्येक खेपेला बाई भेटल्या की नव्या वहीच्या पहिल्या पानासारख्या वाटायच्या; एकदम नव्या कोऱ्या (झुंबर). यासारख्या अनेक सुंदर प्रतिमा या कथासृष्टीत जागोजाग विखुरल्या आहेत. प्रकाश संतांचा मानसपुत्र अनेक पौराणिक व्यक्तींचा आणि घटनांचा मार्मिक संदर्भ देतो. हे संदर्भ कथेची रोचकता वाढवितात. पुढील पौराणिक संदर्भ पाहण्यासारखे आहेत :

(१) वनवासासाठी जाताना राम भरताशी बोलला नसेल तेवढं आज्जी मला काय





अनुक्रमणिका

काय सांगत होती. (शर्यत) (२) गोष्टीतल्या एकलव्याप्रमाणे आजोबांनी टेबलाचं काम चालूच ठेवलं. (भेट) (३) कृष्णाला घेऊन जाणाऱ्या वसुदेवाप्रमाणे बाबूराव मला घेऊन डब्याच्या दारापर्यंत गेला. (भेट) (४) आम्ही तुकाराम महाराजांसारखं भजन सुरू ठेवलं आणि बाकीचं सगळं विसरून गेलो. (मैत्री) (५) शंभर कौरव आणि त्यांचं ते अठरा कायकी सैन्य त्यांच्या चक्रव्यूहात सापडलेल्या अभिमन्यूसारखे मास्तर बाहेर एकटेच उभे होते. (शारदासंगीत)

लंपन काही वेळा इतिहासातील दाखले देतो. उदाहरणार्थ, ''खेकडे बेटे गोष्टीतल्या नाना फडणिसांसारखे शहाणेच. ते एकदम कधी दिसायचे नाहीत.'' (खेळ)

वाचनवेड्या लंपनने गोष्टींच्या अनेक पुस्तकांचा फडशा पाडला आहे. अनेक पौराणिक आणि ऐतिहासिक कथा त्याला मुखोद्गत आहेत. तेव्हा अगदी सहजपणे केव्हाही या गोष्टींचा आपल्या कथनात तो उपयोग करतो.

लंपन-कथांमधून काही खास वाक्प्रचार आणि शब्द प्रकाश संतांनी मराठी भाषेला दिले आहेत. पुढील वाक्प्रचार लक्षणीय आहेत :

(१) पट्टा सोडणे – रागावून बोलणे, टाकून बोलणे

(२) विठोबा होणे – भान हरपून पाहत राहणे

(३) पाचोळा उडविणे – दोष देणे, त्रास देणे

(४) परतणे – रागावून बोलणे, झाडणे

काही नवीन शब्द : 'बोलवसा'- सारखे बोलण्याचा घेतलेला वसा. 'टाचणीस्फोट शांतता' – टाचणी पडली तर आवाज येईल एवढी शांतता.

संतांच्या कथासृष्टीतील भाषा बहुरूपिणी आहे. या भाषेचे अभिव्यक्तिसामर्थ्य विलक्षण आहे. ही भाषा कथनकर्त्याची भाषा आहे. लिहिणाऱ्याची नाही. म्हणजे लंपनसमोर आपण वाचक बसलो आहोत श्रोते म्हणून आणि लंपन आपल्याला गोष्ट सांगत जातो, असे या भाषेचे स्वरूप आहे. त्यामुळे तिला ग्रांथिक आणि लिखित स्वरूपाचे रूप नाही. ती खूप चैतन्यशील, आणि गतिमान आहे. या भाषेला एक खळाळता ओघ आहे. या साध्यासुध्या वाटणाऱ्या भाषेला विलक्षण अर्थव्यंजकता आहे. सुचविण्याची तिची क्षमता मोठी आहे. या भाषेत चित्रमयता आहे आणि रसोत्कटता आहे. लंपनप्रमाणेच लंपनची भाषाही उत्साहाचे कारंजे आहे.

■

साईकृपा सहकारी गृहरचना संस्था, मार्कंडी, चिपळूण, जि. रत्नागिरी
दूरभाष (९५२३५५) २५४७०८

# व्याकरणविषयक एक विचार

उमाकांत रा. कामत

मराठी व्याकरणाचा पदवी वा पदव्युत्तर परीक्षेसाठी अभ्यास करताना मोरो केशव दामले यांचे या विषयावरील पुस्तक एक आधारभूत ग्रंथ म्हणून सतत वापरले जात आहे. मराठी व्याकरण-विचाराला दामले यांनी शास्त्रीय वळण दिले, असे म्हटले जाते. त्यांनी केलेली सर्व चर्चा त्या काळात रूढ असलेल्या पृथक्करणात्मक (अॅनॅलिटिकल) पद्धतीने केली आहे. ही पद्धती मूलतः भौतिक (पदार्थविज्ञान) शास्त्राने विकसित केली व प्रचारात आणली. वस्तूमधले घटक वेगळे करून त्यांचा स्वतंत्रपणे (पृथक् पृथक्) अभ्यास केल्यास त्या वस्तूचे एकूण स्वरूप कळते, अशी धारणा त्यामागे होती. हीच खरी शास्त्रीय पद्धती आहे, अशी त्या काळातील बऱ्याच शास्त्रज्ञांची व तत्त्ववेत्त्यांची समजूत होती. भाषेचा मूळ घटक जो शब्द त्याचे रूप अभ्यासले, म्हणजे भाषेचा शास्त्रीय विचार झाला, अशी समजूत त्यातून जन्माला आली. शब्दविचार-रूपविचार हा भाषेचा मूलभूत विचार आहे, अशा धारणेतून व्याकरणाची मांडणी झाली. संस्कृतमधील वैयाकरणी परंपरादेखील या धारणेला पुष्टी देणारी ठरली, असे दिसते.

तथापि विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात सर्व क्षेत्रांतील अभ्यासकांना या पद्धतीतील उणिवा व त्यामुळे अनुमानांना पडणाऱ्या मर्यादा स्पष्टपणे जाणवू लागल्या. पृथक्करणात्मक पद्धती कोणतीही वस्तू वा विषय यामधील घटक व त्यांचे गुणधर्म समजून घेण्यापुरती (म्हणजेच एका सीमित स्वरूपात) अभ्यासकांना उपयुक्त असली, तरी त्यामुळे विषयाचे पूर्ण स्वरूप नीटपणे कळत नाही. विश्वातील सर्व घटना त्या आधारे पूर्णपणे उलगडता येत नाहीत, हे ध्यानात येऊन चुकले आहे. उदा० पृथ्वी, चंद्र, सूर्य व इतर ग्रह तारे हे सर्व अलगपणे अभ्यासले, म्हणजे विश्व वा अवकाश समजले असे होत नाही. प्रत्येक गोलाचे अस्तित्व व रूप अलगपणे अभ्यासून तेवढ्याच आधारे निष्कर्ष काढल्यास वा निर्णय केल्यास दिशाभूल होते. परस्परांना तोलून धरणारी त्यांची स्थाने व परस्परसंबंध यांचे गुंतागुंतीचे स्वरूप व त्यातून उद्भवलेली गतिमानता यांचे रहस्य पृथक्करण पद्धतीने उलगडत नाही, हे शास्त्रज्ञांच्या ध्यानात येत गेले.

मानव प्राण्याबाबत हा विचार अधिक दक्षपणे केला पाहिजे. मानवी शरीरातील हाडांचा नुसता ढीग म्हणजे मानवी सांगाडा नव्हे. किंवा शरीरातील सर्व अवयवांची गोळाबेरीज म्हणजे माणूस नव्हे. त्या हाडांची वा अवयवांची परस्परांशी विशिष्ट रीतीने जुळणी वा रचना होते. त्यांना एकत्र बांधणारे काही घटक असतात. तसेच त्यामध्ये एक प्राणतत्त्व अस्तित्वात येऊन कार्यरत झालेले असते. आणि त्यातून क्रियाप्रक्रियांची एक सातत्यपूर्ण साखळी (फंक्शनल कंटिन्युइटी) निर्माण होते. आणि ती गुंतागुंतीची वा व्यामिश्र असते. मानवी शरीराचे सर्व व्यापार त्यातून उगम पावतात. कोणत्याही एका शारीरिक संस्थेच्या किंवा सर्व शारीरिक संस्थांच्या (अस्थिसंस्था, स्नायुसंस्था इ०) स्वतंत्र अभ्यासातून शारीरिक क्रियांचा नीटपणे उलगडा होत नाही.

यावरून असे म्हणता येईल की, कोणत्याही सजीवाबद्दलच्या विषयाचा अभ्यास करताना, त्यात अंतर्भूत असणाऱ्या घटकांची रचना (स्थान, स्थिती व जुळणी), तसेच परस्परसंबंध व प्राणतत्त्व यांचा स्पष्ट विचार केला पाहिजे.

व्याकरणविचार ज्या भाषेबद्दल केला जातो ती भाषा सामान्यतः दीर्घकाळ सातत्याने एखाद्या मानवी समूहात बोलली जात असते व लिखित साहित्यरूपात विकसित झालेली असते. अशा प्रकारचा भाषिक विकास हा त्या समूहातील माणसांच्या वैयक्तिक आणि सामूहिक विकासाशी निगडित असतो – किंबहुना, एकूण मानवी विकासाचाच तो भाग असतो. मानवाखेरीज अन्य कोणत्याही प्राण्याला अशा प्रकारचा भाषिक विकास साधता आलेला नाही. या अर्थाने भाषा व भाषिक व्यवहार हा खास मानवी वर्तनाचाच एक उच्च प्रकार म्हणता येईल. त्यामुळे भाषिक व्यवहारासंबंधीच्या कोणत्याही शास्त्राला समग्र मानवी वर्तनाचा अभ्यास करणाऱ्या 'मानसशास्त्रा'च्या मूलभूत तत्त्वांची वा निष्कर्षांची दखल घेणे आवश्यक ठरेल.

गेल्या शतकारंभी मानसशास्त्रातही मानवी वर्तनाचा तुकड्या तुकड्यांनी अभ्यास करणारी – तथाकथित शास्त्रीय पद्धती वापरणारी वर्तनवादी शाखा प्रभावी होती. पण तिची अपूर्णता लक्षात आल्यामुळे गेल्या शतकाअखेर 'संपूर्ण' वर्तनाचे स्वरूप समजून घेण्यावर भर दिला जाऊ लागला. मानवी वर्तन हे स्वतंत्र तुकड्यांचे, स्थिर वा निर्जीव नसून, प्रत्येक पातळीवर ते हेतुपूर्ण, परस्परसंबद्ध व संघटित असते. मानवाच्या प्रत्येक आकलनात व कृतीतही ही 'संघटना' असून ती अर्थपूर्ण, परिवर्तनशील, विकसनशील, विविध रूपात्मक (साचेबंद नव्हे) व गतिशील - चैतन्यशील असते. मानवी वर्तन ज्या 'अवकाशात' घडते. त्याचा वर्तनावर होणारा परिणाम अभ्यासत असताना शास्त्रज्ञांना वर्तनवादी दृष्टिकोण बाजूला सारावा लागला आहे.

भाषा हे तर माणसाचे निसर्गदत्त वर्तन नसून मानवी समूहाने प्रयत्नपूर्वक परस्पर

क्रिया-प्रतिक्रियांतून विकसित केलेले संपादित वर्तन आहे. निसर्गदत्त आवाजाचा म्हणजे ध्वनीचा आपल्या अनुभूतीच्या आविष्कारासाठी, निवेदनासाठी व देवाण-घेवाणीसाठी परिश्रमाने व बुद्धिकौशल्याने केलेला नवलपूर्ण उपयोग आहे. मानवाने हेतुतः विकसित केलेले हे साधन म्हणजे एक 'नवा शोध वा मानवी निर्मितीच आहे. विशिष्ट आकलन-अनुभूतींसाठी वेगवेगळी ध्वनिरूपे वापरणे, वारंवार अनेकांनी ती त्याच अनुभूतीसाठी वापरल्यामुळे त्या त्या ध्वनिरूपाला विशिष्ट 'अर्थ' प्राप्त होणे व त्या जनसमूहात त्या अर्थाने ते ध्वनिरूप रूढ होणे – ही सर्व दीर्घ-कालीन प्रक्रिया प्रत्येक भाषेमागे असते. या प्रक्रियेने विशिष्ट ध्वनिरूप त्या जनसमूहात विशिष्ट 'अर्था'चे वा अनुभूतीचे प्रतीक बनते. प्रत्येक भाषा ही अशा ध्वनिरूप प्रतीकांची एक 'व्यवस्था' असते. ती त्या त्या समूहामधील माणसांच्या देवाणघेवाणीतून आपोआप तयार होते. एखाद्या अनुभवाच्या वा कल्पनेच्या वा वस्तूच्या ऐवजी प्रतीक वापरण्याची क्षमता मानवप्राण्यामध्ये सर्वात अधिक आहे, असे मानसशास्त्रीय संशोधन सांगते. ही ध्वनिरूप प्रतीके केवळ सामाजिक चलन म्हणून वापरली जात नसून ती प्रत्येक व्यक्तीच्या अंतर्गत मानसिक घडणीचीही माध्यमे बनतात. आपण आपल्या सभोवतालच्या प्रत्येक वस्तूचे आकलन त्या विशिष्ट ध्वनिरूपाशी साहचर्य जोडून करीत असतो (उदा० 'झाड' हे ध्वनिरूप व निसर्गातील झाडाचे दृश्यरूप ही मनात एकत्र येऊन ठसतात.) त्या त्या वस्तूंचे स्मृतिठसे विशिष्ट ध्वनिसमुच्चयासह स्मृतीत जतन केले जातात. वस्तूंमधील भेदांचे आकलन-स्पष्टीकरण, पुनर्जागृती, कल्पना, विचार इ० सर्व क्रिया विशिष्ट ध्वनिसमुच्चयांच्या साहाय्यानेच होतात. म्हणजे प्रत्येक मानवी व्यक्तीची आंतरिक घडण त्या त्या समूहाच्या भाषेतूनच घडते. ही सर्व क्रिया फार गुंतागुंतीची असते.

सामाजिक पातळीवरही अनुभवांची देवाणघेवाण, सामूहिक विचार, नवसंशोधन, परिवर्तन इ० क्रिया भाषेच्या साहाय्यानेच होत असते. भाषेच्या या कार्याचा विकास होण्यासाठी श्राव्य ध्वनिरूपांना रेखात्मक दृश्यरूप देण्याची पद्धतीही मानवाने आपल्या बुद्धिसामर्थ्याने शोधून काढली. रेषात्मक किंवा लिखित रूपामुळे अनुभव वा विचार जतन करून ठेवण्याची युक्ती माणसाला गवसली. पण हे लिखितरूप मूळ अनुभूतीपासून दोन टप्पे दूर असते. मूळ अनुभूतीचे प्रतीक म्हणून ध्वनिरूप (बोली भाषा) आणि ध्वनिरूप प्रतीकाचे रेषात्मक प्रतीकात रूपांतर म्हणून लिखित भाषा, अशी ही प्रक्रिया असते.

भाषा लिपीबद्ध होऊ लागल्यावरच भाषेला काहीसे स्थैर्य येते. भाषेत विविध प्रकारची साहित्यनिर्मिती होऊ लागते व त्यानंतरच सामान्यतः व्याकरणविचार सुरू होतो. तसेच विशिष्ट भाषा व्यवहाराचा विविध अंगांनी अभ्यास सुरू होतो. एखादी

स्वरूप स्पष्ट होण्यासाठी पुढील स्वरूपात ती प्रक्रिया मांडता येईल.




(प्रस्तुत मांडणी हा प्रक्रिया-स्पष्टीकरणाचा एक स्थूल व मर्यादित प्रयत्न आहे) या संपूर्ण प्रक्रियेतील अंतर्भूत घटक, त्यातील व्यक्तिगत भिन्नता – त्यांचे परस्परसंबंध व लिखित शब्दरूपांतर होताना त्याला पडणाऱ्या मर्यादा यांचे भान ठेवल्याशिवाय केवळ शब्दरूपांचा अभ्यास करून निर्णय देणे कितपत उचित होईल याचा विचार व्याकरणकाराने केला पाहिजे.

भाषा शब्दांनी बनलेली दिसते. अर्थयुक्त एकगठित ध्वनिसमूह म्हणजे शब्द. व्याकरणात शब्दातील उच्चारांचे पृथकरण करून मूळ उच्चार शोधले जातात. मराठीत या मूळ उच्चारांना वर्णमाला म्हटले जाते व त्यांची स्वर व व्यंजने अशी विभागणी करून त्यांचे उच्चारानुसार वर्गीकरण व क्रमशः मांडणी केली जाते. पण ही मांडणी मराठी भाषेच्या उच्चारणातील मूळ घटक समजून घेण्यापुरतीच उपयोगी असते. प्रत्यक्षात भाषा जन्मताना वा विकसित होताना या मुळाक्षरांपासून ती निर्माण होत नाही. कोणत्याही भाषेतले आरंभीचे शब्द हे (उत्स्फूर्त उद्‌गार वा निसर्गातील ध्वनींचे अनुकरणरूप म्हणून) संमिश्र ध्वनीच असावेत. वरवर पाहता, शब्द हा भाषेचा मूळ घटक वाटत असला तरी मानसशास्त्रदृष्ट्या भाषेचे घटकरूप वाक्याचेच असते. लहान





अनुक्रमणिका

भाषा बोलणारा समूह/समाज जेवढा विस्तृत वा विखुरलेला असेल, तेवढी उच्चारणात व अर्थयुक्त ध्वनिरूपात विविधता असते. व्याकरणकार अशा विविधतापूर्ण व परिवर्तनशील भाषिक व्यवहारात अंतर्भूत असलेली 'एक व्यवस्था' शोधून काढतो. ती शोधताना भाषेचा हेतुवादी समग्रसमावेशक पूर्णाकृतिवादी परस्परसंबंधात्मक संघटनात्मक गतिशील व कार्यात्मक इ० बहुरूपात्मक दृष्टिकोणांचा मेळ घालूनच कोणत्याही भाषेचा अभ्यास करावा लागेल हे उघड आहे.

मानवी व्यक्तीचे परिसराविषयीचे आकलन आविष्कृत करणे व ते इतर व्यक्तींपर्यंत पोचविणे हे भाषेचे मूळ उद्दिष्टकार्य आहे. ते नजरेआड करून कोणताही भाषिक अभ्यास 'शास्त्रीय' होऊ शकणार नाही, हे उघड आहे. अर्थाभिव्यक्ती व अर्थवहन हाच भाषेचा पाया असतो. तो उपेक्षून उभी केलेली भाषिक अभ्यासाची इमारत म्हणजे मुळापासून तोडलेली वृक्षाची निर्जीव फांदी ठरेल.

भाषेच्या या समग्र रूपापासून अलग करून केवळ शब्दरूपांचा विचार करण्याचा व्याकरणकारांचा आग्रह हा त्यामुळे केवळ एकांगी, अपुरा व तोकडा विचार ठरतो, हे सहज लक्षात येईल. पदवी वा पदव्युत्तर पातळीवर मराठी व अन्य कोणत्याही भाषेचा अभ्यास करणाऱ्याला त्या भाषेचे समग्र रूप ध्यानात घेण्याची 'दृष्टी' प्रथम आत्मसात् करावी लागेल. अध्यापकांनाही त्याच दृष्टिकोणातून विषयाची मांडणी करावी लागेल– तशी ती केली पाहिजे. भाषेच्या भिन्न अंगांचा विचारअभ्यास करताना काढलेली अनुमाने, निष्कर्ष, सिद्धान्त व त्यांतून उद्भवणारे वाद अनेकदा अभ्यासक विद्यार्थ्यांना गोंधळात टाकतात. एक प्रकारच्या संभ्रमावस्थेत विद्यार्थी येऊन ठेपतो व तेथेच त्याचा अभ्यास थांबतो / संपतो. त्याचे कारण व्याकरण, भाषाशास्त्र, व्युत्पत्ती, काव्यशास्त्र, समीक्षक इ० भिन्न अंगांनी केलेल्या विचारांतून काढलेले काही निष्कर्ष परस्पर-विसंगत वाटतात व त्यांचा मेळ विद्यार्थ्यांना घालता येत नाही.

भाषिक व्यवहाराचे मूळ रूप दोन व्यक्तींमधील परस्पर-संपर्काचे असते. एका व्यक्तीने आपला कोणताही अनुभव वा इंद्रियगोचर संवेदना दुसऱ्याला वा इतरांना कळविण्याच्या प्रयत्नांतून 'भाषा' निर्माण होते. व्यक्तीच्या अशा धडपडीतून हावभाव, मुद्राभाव इ० वगळून आपण केवळ ध्वनिरूपांचाच विचार भाषाभ्यासात करतो, हीही मर्यादा प्रथम लक्षात ठेवली पाहिजे. ध्वनिरूपांतील आवाजाचा लहानमोठेपणा, स्वरातील उच्चनीचता, कंपने-आंदोलने, नादाची जात (टिंबर) इ० श्रुतिगम्य महत्त्वाचा भाग लिखित रूपात भाषा अभ्यासताना वगळला जातो, हेही ध्यानात घेतले पाहिजे. मूळ भाषिक आविष्कारातील विविध घटक वगळून उरलेल्या लिखित रूपाला किती मर्यादा पडतात याची अभ्यासकांनी दखल घेतली पाहिजे. भाषिक संपर्काचे मूलभूत



अनुक्रमणिका

मूल आरंभी एक शब्द – तोही अनुकरणाने – उच्चारू लागते; पण त्याच्या भाषिक मानसिक विकासात दोन शब्दांचे वाक्य लवकरच रचले जाते. वस्तुवाचक नाम व क्रिया (उदा० खाऊ खाणे, चिऊ उडणे) लवकरच एकत्र येतात. प्रौढांच्या संभाषणातही कधी कधी एकच शब्द उच्चारला जातो, तेव्हाही छोटे पूर्ण वाक्यच अभिप्रेत असते व ऐकणारा त्याच अर्थाने ते समजून घेत असतो.

लहान मुलांना प्रथम अक्षर-ओळख करून देताना सुटी वर्णमाला न शिकविता छोट्या वाक्याद्वारे प्रत्यक्ष वस्तू वा चित्राच्या साहाय्याने परिचित वस्तूंची सुलभ (शक्यतो 'अ'कारयुक्त) नावे (उदा० अननस, बदक, नळ, वजन इ०) वाचायला शिकविल्यास त्यांची प्रगती लवकर होते.

व्याकरणातही वाक्य हेच सर्व विवेचनाचा पाया असले पाहिजे. भाषेतील शब्दरूपे केव्हाही स्वतंत्रपणे अस्तित्वात येत नाहीत. उदा० 'फूल' हा शब्द फुलास, फुलाने, फुलाचा इ० रूपे स्वयंभूपणे धारण करीत नाही. किंवा 'जाणे-जा' याची जातो, गेला, जाणार इ० रूपे आपणहून होत नाहीत. ती बोलणाऱ्या-लिहिणाऱ्याच्या मनातील अर्थ-आशयानुसार तो वापरत असतो. विशिष्ट अर्थ/अनुभव कालसापेक्षतेने व्यक्त करण्याच्या त्याच्या प्रयत्नातून व्यक्त झालेल्या वाक्यातच ती रूपे येतात. एक पूर्ण अर्थ सांगण्यासाठी शब्दांची जी पूर्ण संघटना करावी लागते, त्या प्रक्रियेत त्या शब्दांना भिन्न रूपे द्यावी लागतात. संघटना करताना वाक्यात योजावयाच्या शब्दांचा परस्परसंबंध जोडावा लागतो. त्यातून सलग अर्थ तयार होतो. म्हणजे विशिष्ट अर्थाभिव्यक्ती होण्यासाठीच शब्दाची रूपे हेतुतः बदलावी लागतात. नाम सर्वनामांची विभक्तिरूपे व क्रियापदांची काळ/अर्थरूपे अर्थसिद्धीसाठीच केली जातात. अशा रूप-परिवर्तनाला शब्दविकार म्हटले जाते. यावरून शब्दविकारांचा विचार-अभ्यास अर्थनिरपेक्ष होऊच शकत नाही, हे उघड आहे. 'व्याकरण' हे भाषेचे 'स्पष्टीकरण' असेल तर ते अर्थघटकापासून अलग-पृथक् करून कसे होऊ शकेल ? त्यातील अर्थ वगळल्यास / काढून घेतल्यास उरतात केवळ निरर्थक/अर्थशून्य ध्वनिरूपे. त्यांना 'भाषा' म्हणताच येणार नाही. त्यांचे व्याकरण कसे होणार ? फार तर त्यातील घटकवर्ण सांगता येतील.

वरील विवेचनावरून 'विभक्ती' म्हणजे नाम सर्वनामांना अर्थपूर्ण संबंधदर्शक वाक्यात संघटित करताना त्यांच्या रूपात घडणारे बदल किंवा विकार असे म्हणता येईल. दादोबांनी केलेली व्याख्या अशी – 'विभक्ती म्हणजे कारकसंबंधादि अर्थसूचक जे प्रत्यय, ते लागून जे रूप सिद्ध होते, त्या रूपाची संज्ञा – तदंतर्गत जे अर्थ आहेत त्यांची संज्ञा नव्हे' अर्जुनवाडकर तीच स्वीकारतात, वेगळी व्याख्या देत नाहीत.





अनुक्रमणिका

'व्याकरणाची प्रमाणं : रूपं आणि अर्थ. रूप प्रथम प्रमाण, अर्थ हे दुय्यम' (पृ. ७८) असे ते म्हणतात. विभक्तीबाबतही ते याच स्वरूपाचे विवरण (पृ. १४५) करतात. म्हणजे विभक्ती ही एका रूपाची संज्ञा, की अशा प्रकारे होणाऱ्या विकरणाची (शब्दपरिवर्तनाची), हे स्पष्ट होत नाही. दादोबांच्या मूळ व्याख्येत 'अर्थसूचक' हा शब्द वापरून 'शब्दांतील अर्थसंबंध दाखविण्याच्या मुख्य कार्याला गौणत्व दिलेले दिसते – निदान तसे सूचित होते. स्पष्ट भूमिका अशी असायला हवी की, अर्थ हेच भाषेचे प्राणतत्त्व आहे. भाषेतील शब्दाला 'शब्दपण' त्यामुळेच येते. तेव्हा अर्थसंबंध-विरहित विभक्ती असूच शकत नाही. अर्थसंबंध जोडण्यासाठी, निर्माण करण्यासाठी नाम-सर्वनामांना लागणारे प्रत्यय ही केवळ साधने आहेत. साधनांना प्रथम स्थान देणे म्हणजे मोठाच विपर्यास. शस्त्रे म्हणजे लढाई नव्हे. कागदावर रेघोट्या ओढल्या म्हणजे ते लेखन होत नाही.

वैयाकरणी भाषेच्या केवळ बाह्यरूपाचाच विचार करतात. पण विभक्तींच्या प्रत्ययांचे वर्गीकरण करताना अर्थ वा कार्य लक्षात घ्यावे लागते, हे ते सोईस्करपणे विसरतात. उदा० द्वितीया वा चतुर्थीचे स, ला, ते हे प्रत्यय एका गटात कसे टाकले जातात ? ते एकमेकांना समानार्थी पर्याय म्हणून वापरता येतात – म्हणजेच त्यांचा 'अर्थ' वा 'कार्य' समान असते म्हणूनच ना ? वर्गीकरणात अर्थतत्त्व वापरावे लागते, मग मूळ व्याख्येत वा संकल्पनेत ते वगळून चालेल काय ? मुळात संपूर्ण रूपातून प्रत्यय अलगपणे विचारात घेणे हेही कितपत शास्त्रीय आहे ? उदाहरणार्थ, 'ला' या प्रत्ययाच्या भिन्न उपयोगांची वाक्ये विचारात घेऊ.

मला वाटते (कर्ता) मला गरगरते
मी चोराला पडकतो (कर्म)
आई मुलाला दूध देते (संप्रदान)
तो गावाला निघतो (उद्दिष्ट/दिशा) प्रभा नगरला गेली
भाऊ दिल्लीला राहतो (स्थान)
गाडी सकाळी पाचला सुटते (वेळ)
ती कामाला जाते (कार्य / हेतू)
सुभाषला बहीण नाही (संबंध)
गाडीला घोडा हवा. घराला छप्पर हवं (गरज)
चिमणीला पंख असतात (वस्तू-भाग)
त्या पँटला हा शर्ट शोभतो (सान्निध्य)
रुपयाला एक केळे मिळते (विनिमय)

शेराला सव्वाशेर (मान)

या वाक्यांतील अर्थसंबंधांच्या सर्व छटा द्वितीया वा चतुर्थीच्या रूढ कारकार्थात बसवता येत नाहीत. अप्रत्यय शब्द/नाम प्रथमेत किंवा द्वितीयेतही असू शकते. उदा० पोपट पेरू खातो. या नामांची विभक्ती सांगण्यासाठी अर्थसंबंधच तपासावा लागतो.

पंचमीचे प्रत्यय ऊन-हून अपादान कारकसंबंध सांगतात; पण 'अरुण सतीशहून मोठा आहे' या वाक्यात 'तुलनेने कारक' सांगण्याचा विशेषणाशी निगडित अर्थ असतो. संबोधन-विभक्तिरूपाचा वाक्यातल्या कोणत्याही शब्दाशी संबंध नसतो. संबोधन ही विभक्ती 'संबंध' नाकारणारी आहे. 'शी' हा विभक्तिप्रत्यय तृतीयेचा समजला जातो. पण त्याचे 'ने ई आ' या तृतीयेचा अन्य प्रत्ययांशी साधर्म्य नाही- हे इतर प्रत्यय कर्ता (कर्मणी प्रयोगात) व करण हे कारक संबंध सांगणारे आहेत. पण 'शी' हा प्रत्यय वेगळ्या अर्थाचेही सूचन करतो. उदाहरणार्थ–

रजनीची नंदिनीशी मैत्री आहे.
भारताची चीनशी स्पर्धा आहे.
इंग्लंडची फ्रान्सशी लढाई झाली
त्याचे भावाशी भांडण झाले
डोंगराच्या पायथ्याशी ओढा आहे. (-पाशी = जवळ, स्थान)
आपले काम पैशाशी
तो मित्राशीक जत्रेला गेला (बोली भाषा)-(सोबतीने)

या चर्चेवरून एक गोष्ट स्पष्ट होऊ शकेल – प्रत्यय स्वतंत्रपणे निर्माण होत नाहीत. त्यामुळे ते अलग करणे ऐतिहासिक व्युत्पत्तिशास्त्रालाही सुसंगत नाही. भाषेत विशिष्ट अर्थसंबंध गठित करण्यासाठी मूळ नामादिकांचे विशिष्ट रूप करण्याची प्रवृत्ती एखाद्या भाषिक समूहात रूढ होते. पण मानवाला निसर्गाने कोणतेही साचेबंद वर्तन (हृदय स्पंदनासारखे जीवशास्त्रीय प्रतिक्षेप वगळता) दिलेले नाही. त्यामुळेच मानवाच्या सर्व वर्तन-व्यापारात लवचिकता असते, परिवर्तनशीलता असते, विविधताही असते. व्याकरणकार एकूण भाषा व्यवहारात अंतर्भूत असलेली काही 'व्यवस्था' शोधण्याचा प्रयत्न करीत असतो. त्यामुळे भाषेत काही प्रमाणात प्रमाणभूतता व सातत्य येऊ शकते. पण काळाच्या ओघात तसेच प्रदेशानुसारही भाषाव्यवहार बदलत असतो. व्याकरणाच्या शिस्तबद्ध चौकटीत जिवंत भाषा कधीच बंदिस्त राहात नाही. अलिकडच्या १००-१५० वर्षात मराठी भाषेतील वाक्यरचना तसेच लेखनपद्धतीही बदलत गेली आहे. शुद्धलेखनाचे नियमही बदलले आहेत.

भाषेच्या या नित्य चैतन्यशील प्रकृतीचा विचार करून मराठी भाषेच्या व्याकरणकारांनी आपला दृष्टिकोण बदलला पाहिजे. कोणत्याही गोष्टीच्या केवळ बाह्यांगापुरता विचार करणे अपुरे असते. उदा० डोळा हा अवयव. बाह्यतः त्याच्या सौंदर्याचे आपण वर्णन करतो. पण त्याच्या अंतर्गत रचनेत खूप गुंतागुंत असते. तशीच काहीशी भाषाव्यवहारात आहे. भाषेतील अनेक संज्ञा सापेक्ष असतात उदा० आई-मूल, भक्त-दैवत इ० भक्त या संज्ञेचा अर्थ ईश्वर वा अन्य कोणत्यातरी दैवतसंदर्भातच कळू शकतो. 'विभक्ती' ही संज्ञाही तशीच सापेक्ष आहे. 'विभक्त' म्हणजे वेगळे, अलग. या अर्थाच्या उलट 'विभक्ती' म्हणजे 'विशेष भक्ती' असा अर्थ दिसतो. वाक्यातल्या कोणत्यातरी अन्य शब्दाशी विशेष अर्थपूर्ण नाते विभक्तिरूपात अभिप्रेत असते. ते समजून घेणे अभ्यासकाला प्रथम आवश्यक असते. नाम सर्व नामांची विभक्तिरूपे, क्रियापदांची अर्थ – कालवाचक रूपे, विशेषणांचे स्थान व सामान्यरूप आणि उभयान्वयी, क्रियाविशेष व शब्दयोगी अव्यये, हे सर्व वाक्यातील संघटनात्मक घटक असतात. यातील अव्ययांचे स्थानही ठरावीक असते. केवलप्रयोगी अव्यय संघटनेत प्रत्यक्ष भाग घेत नाही; परंतु वाक्यारंभी येऊन अर्थदृष्ट्या संपूर्ण वाक्याचा भावार्थ ते भर देऊन ते व्यक्त करते. या सर्व घटकांच्या यथायोग्य संघटनेतून बोलणाऱ्या / लिहिणाऱ्या व्यक्तीचा अभिप्रेत आशय व्यक्त करण्याची कोशीस चालू असते. लिखित मजकुरात वाक्यांचीदेखील एकापुढे एक गुंफण त्याच अर्थसंघटनेच्या तत्त्वावर चालू असते. त्यातून लिखित मजकुरातील परिच्छेद व अनेक परिच्छेदांतून सलग लेख अवतरतो. साहित्याच्या विविध प्रकारांतही अशीच संघटना असते. फक्त त्यातील मध्यवर्ती आशय व संघटनेचा आकारबंध वेगवेगळा असतो त्याला साहित्यात आपण 'निर्मिती' म्हणतो.

मानवाच्या एकूण सर्व भाषाव्यवहारातच 'निर्मिती'चा भाग मोठा असतो. त्यासाठी लागणारे बुद्धिकौशल्य, लवचिकता व विपुल नवनिर्माण क्षमता यांचे वरदान निसर्गाने मानवालाच दिले आहे. भाषेच्या कोणत्याही अंगाने विचार-अभ्यास करताना म्हणूनच तो केवळ प्रत्ययांसारख्या बाह्य चिन्हाच्या आधारेच न करता, भाषेचे अर्थाभिमुख संघटनातत्त्व, लवचिकता व परिवर्तनशीलता यांना प्राधान्य देऊन केला पाहिजे. तज्ज्ञ डॉक्टरमंडळी शरीराच्या केवळ बाह्य लक्षणांवरून एखाद्या व्यक्तीच्या प्रकृतीचे निदान करीत नाहीत. त्या त्या बाह्य लक्षणांचा आंतरिक विविध प्रक्रियांशी असलेला संबंध समग्रपणे ध्यानात घेऊनच आरोग्याच्या स्थितीबद्दल निदान करतात. शरीरांतर्गत प्रक्रियांची ही गुंतागुंत ज्याला नीट उमजते, त्याचेच निदान योग्य ठरते.

म्हणूनच भाषेबाबत केवळ प्रत्ययांचे सादृश्य लक्षात घेऊन विभक्तींची संख्या

कमी करण्याचा वाद उपस्थित करणे उचित नाही. प्रथमा विभक्तीला स्वतंत्र प्रत्यय नाही. द्वितीयाही काही वेळा अप्रत्ययी असते. म्हणून द्वितीया गाळावी. द्वितीया व चतुर्थी यांचे प्रत्यय समान आहेत, म्हणून त्यांतील एक गाळावी. षष्ठीला कारकार्थ नाही म्हणून ती गाळावी – असले वाद निर्माण करून व्याकरणकारांनी संभ्रम निर्माण करू नये. प्रत्ययांना प्राधान्य म्हणजे साधनांना साध्याचे महत्त्व देण्याच्या मोठ्या प्रमादामुळे असा गोंधळ निर्माण होतो. त्यामुळे मराठी भाषेचे विद्यार्थी व शिक्षकही आजन्म गोंधळलेले राहतात.

हे टाळण्यासाठी व्याकरणातील रूपविचार हा केवळ साधनस्वरूप मानून अर्थसिद्धी हेच साध्य मानले पाहिजे. मराठी व्याकरणात नाम-सर्वनामादि शब्दांच्या आठ जाती सांगितल्या आहेत, त्या अर्थ व कार्य यांना अनुसरूनच (बहुतांश) आहेत. नाम-सर्वनामांना होणारा लिंगविकार व वचनविकार यांबाबतचा निर्णय केवळ रूपे वा प्रत्यय पाहून आपण ठरवीत नाही. मराठीत (निर्जीव) वस्तुवाचक नामांचे लिंग केवळ रूढीनेच ठरलेले असते. काहींबाबत संस्कृत भाषेतील परंपरेचा प्रभाव दिसतो. काहींबाबत मराठीने स्वातंत्र्य राखले आहे. वचनविकाराबाबतही तसेच म्हणता येईल. शब्द एकवचनी की अनेकवचनी हे त्या वाक्यातील विशेषण वा क्रियापद यांच्या रूपावरूनच सांगता येते.

डोंगर हिरवा दिसतो / हिरवे दिसतात.

पक्षी उडतो / उडतात.

लेखिका लिहिते / लिहितात.

थोडक्यात, वाक्याची समग्र रूपे व अर्थ लक्षात घेऊन निर्णय द्यावा लागतो. लिंग-वचन या दोन्ही विकारांबाबत अशी स्थिती असताना फक्त विभक्तीबाबत केवळ प्रत्ययांवरून वाद निर्माण करणे रास्त होईल काय ? या प्रश्नाचे नकारात्मक उत्तर द्यावे लागेल.

या पार्श्वभूमीवर व्याकरणकाराने कोणता मार्ग स्वीकारावा, याचेही उत्तर शोधावे लागेल. व्याकरणकाराने त्याची केवळ रूपकेंद्रित – प्रत्ययकेंद्रित दृष्टी बदलून 'अर्थाभिव्यक्तीसाठी रूपसाधना' भाषेत कशी होत असते, याचा अभ्यास करावा व त्याचेच 'व्याकरण' (विस्तरण-विवेचन) करावे. विभक्ती हा रूपविकार वाक्याच्या अर्थसंघटनेसाठीच होतो, हीच स्पष्ट भूमिका मांडावी. विभक्तींच्या नावांत या संघटन-कार्यातील भूमिकांच्या महत्त्वानुसार क्रम ठेवलेला दिसतो, हे लक्षात घ्यावे. 'प्रथमा' विभक्ती प्रत्ययरहित असूनही सर्वांत प्रभावी आहे. तिचाच क्रियापदावर अधिकार चालतो, म्हणजे प्रथमा विभक्तीतील नाम/सर्वनामाच्या लिंगवचनानुसार क्रियापदरूप

मराठीत होत असते. दोन नामे अशी प्रत्ययरहित दिसत असतील, तेव्हा ज्याचा क्रियापदावर अधिकार चालतो ते नाम/सर्वनाम प्रथमेत व दुसरे द्वितीयेत, असे ओळखले जाते. (उदा० 'लेखक कादंबरी लिहितो.' यात 'लेखक' हा शब्द प्रथमेत व 'कादंबरी' हे नाम द्वितीयेत) सामान्यतः कर्ता प्रथमेत असतो. कर्त्याचे स्थान वाक्यातही पहिले. कर्माचे दुसरे म्हणून त्याची विभक्ती द्वितीया... अशा रीतीने वाक्यांतील कार्यानुसार साधारणतः विभक्तींची क्रमवाचक नावे आहेत. स, ला, ते हे प्रत्यय द्वितीया व चतुर्थी या दोन्ही विभक्तींत समान असले तरी त्यांची कार्ये (कारकार्थ) भिन्न आहेत, हेच त्यांची स्वतंत्र स्थाने मानण्याचे मुख्य कारण आहे. षष्ठी विभक्ती मुख्यतः दोन नामांमधला अर्थसंबंध दाखविते. कारकसंबंध (क्रियेशी संबंध) दाखविण्यासाठी तिचा क्वचितच उपयोग होतो, म्हणून तिच्या स्थानाबद्दल वाद घालणे, हे विभक्ती या विकाराच्या उद्दिष्टाबद्दल अज्ञान व्यक्त करण्यासारखे आहे. संबोधन ही प्रामुख्याने नामासाठीच वापरली जाणारी विभक्ती आहे. ही विभक्ती नामाला वाक्यरचनेपासून अलग ठेवते, पण शेषवाक्य कोणाला उद्देशून आहे हे सांगते. म्हणजेच तिला अर्थदृष्ट्या वेगळे कार्य आहे.

प्रत्येक विभक्ती तिच्या मुख्य कार्यापेक्षा वेगळे अर्थसंबंधही व्यक्त करीत असते. त्यामुळे बिचकून जाण्याचे कारण नाही. विभक्तीप्रत्ययांबाबत तथाकथित 'शास्त्रीय' दृष्टीने एकांगी व आग्रही विचार केल्यास अडचणी निर्माण होतात. पण मानवाच्या सर्व वर्तनव्यवहाराप्रमाणेच भाषाव्यवहारही अतिशय लवचीक असतो हे ध्यानात घेतले की अडचणी दूर होतात. कोणत्याही उपलब्ध साधनाचे बहुविध उपयोग करणे हे माणसाच्या शोधनक्षम-कल्पकतापूर्ण बौद्धिक क्षमतेचे महत्त्वाचे वैशिष्ट्य मानले जाते. (उदा० माती, दगड, लाकूड या साध्या नैसर्गिक वस्तूंचे किती विविध उपयोग माणूस करतो, हे सहज लक्षात येऊ शकेल) विभक्तिरूपांच्या विविध उपयोगामुळे भाषेत काटकसर साधली आहे व भाषेला लवचिकता प्राप्त झाली आहे.

भाषेत शब्दाच्या अभिधा, लक्षणा व व्यंजना या तीन शक्ती मानल्या जातात. म्हणजे मुख्यार्थाखेरीज इतर अर्थांनी शब्दांचा उपयोग केला जातो, हे सर्वमान्य आहे. मग विभक्तिप्रत्ययांच्या विविध उपयोगांनी संभ्रांत होण्याचे कारण काय ?

मराठीतील विभक्तिप्रत्यय व त्यांच्या अर्थच्छटांसाठी वापरल्या जाणाऱ्या प्रति, कडे, कडून, करिता, साठी, मध्ये इ० उपयोगी अव्ययांऐवजी इंग्लिश भाषेत प्रेपोझिशन्ज् वापरली जातात. ती नामांपूर्वी येतात, पण धातुरूपे वा क्रियापदे यांच्यानंतर त्यांचा उपयोग केल्यास वेगळाच अर्थ निर्माण होतो (उदा० ब्रिंग इन्, ब्रिंग आऊट, ब्रिंग अबाउट, ब्रिंग टु इ०) संस्कृतमध्ये धातूंच्या पूर्वी उपसर्ग लावल्यास अशीच अर्थभिन्नता





अनुक्रमणिका

निर्माण होते. (उदा० गम्-आगम्-उपगम्-संगम्-अभिगम् इ०) मराठीत 'हात' या नामाबरोबर वेगवेगळी क्रियापदे वापरल्यास अर्थ खूप पालटतो (उदा० हात देणे, हात दाखविणे, हात मारणे, हात पसरणे इ०). अशा रूढ अर्थभेदांना वाक्प्रचार म्हणतात. ते भाषेचे 'सामर्थ्य' समजले जाते. थोडक्यात, शब्दरूपांच्या प्रत्ययनिष्ठ व्याकरण-विचाराच्या चौकटीपलीकडे बराच भाषा व्यवहार उरतो. ते भाषेच्या विकासाचे व समृद्धतेचे लक्षण ठरते.

भाषेतील क्रियापदरूपेही लाख्यात, ताख्यात, इ० प्रत्ययवाचक वर्गीकरणात अडकवून न ठेवता काळ, क्रियेची स्थिती व अर्थोद्देश इ० नुसार ती कशी बदलत जातात, इतर भाषांचा मराठी वाक्यरचना व क्रियापदे यांच्यावर कसा परिणाम होत आहे, याचा वस्तुनिष्ठ अभ्यास आज करावा लागेल.

भाषेचे मूळ बोलीरूप व नंतरचे लिखितरूप यापुढे जाऊन भाषा आज नवनव्या माध्यमात उपयोजिली जात आहे. ध्वनिफिती व ध्वनिमुद्रणाचे विविध प्रकार, तारायंत्र, नभोवाणी, संगणक इ० नवनवी उपकरणे यांत भाषेचे आरेखन वेगवेगळ्या प्रकारे होत आहे. रूढ भाषा इंटरनेटवर संक्षिप्त रूपात अवतरत आहेत. या गतिमान युगात आपली मराठी भाषा व लेखन अधिकाधिक लवचीक बनवावे लागेल. त्याच्या मुळाशी असलेला भाषिक व्यवहार व त्यामागचे मानवी सामर्थ्य यांचे व्यापक आकलन नव्या पिढीला होण्यासाठी व्याकरणानेही व्यापक भूमिका स्वीकारली पाहिजे. ■

102/4-N, अशोकनगर, परांजपे मार्ग, वझिरा, बोरिवली (पश्चिम), मुंबई ४०००९२

**संदर्भ :** अर्जुनवाडकर, कृ.श्री. १९८७, 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद', सुलेखा प्रकाशन, पुणे ९.

[लेखकाने वापरलेल्या मराठी संज्ञांसाठी लेखकाला अभिप्रेत असलेले इंग्रजी प्रतिशब्द :
अवकाश = (Space) , आकलन = (Perception),
कार्यात्मक = (Functional), गतिशील/चैतन्यशील = (Dynamic),
नादाची जात = (timber), परस्परसंबंधात्मक = (Correlational),
पूर्णाकृतिवादी = (Gestalt), प्रतीक = (Symbol),
भर = (Emphasis), वर्तनवाद = (behaviourism),
व्यवस्था = (System),
समग्रसमावेशक = (Holistic), संकल्पना = (Concept),
संघटित = (Organised), संघटनात्मक = (Organisational)]

# रीरी म्हणजे पितळ

ब्रह्मानंद देशपांडे

## १. रीरी पितळेची जोगलादेवी

श्रीचक्रधरप्रभूंच्या परिवारातील एक विलक्षण व्यक्तिमत्त्व म्हणजे आऊसा. दीक्षितांची कन्या : उपासने यांची सून : नाथपंथी उपदेशु : अशी ही स्त्री. तिने विंध्यवासिनी देवीची आराधना केली. तिला दृष्टांत झाला, 'गंगातीरासि जाए : मां तुज परीसु सीधैल:' त्याप्रमाणे आऊसा गंगातीरावर आली. काऊळगावचे (तालुका शेवगाव, जिल्हा अहमदनगर. हे गाव आता नाथसागर धरणात बुडाले आहे.) येथे गंगेवर हातपाय धुवायला आली. तो गावातून धान्य मागून आलेल्या ब्राह्मणाने विचारले, ''हां आइ: तुम्ही काइ चांगदेव राऊळ गोसावियांची:' श्रीचक्रधरप्रभूंचे नाव ऐकताच आऊसांच्या पवित्र अंत:करणात वेध उपजला. तशीच ती जोगेश्वरीसी आली: आणि श्रीचक्रधरप्रभूंना अनुसरली. श्रीचक्रधरप्रभूंनी नाथोबांकरवी तिचे सामान आणविले. त्यात[१]

> तंव तीनि दाम निगाले:
> *रीरीए पितळेची जोगलादेवी:*
> आणि तीतरीया मौहुआचा कृष्णेया:

येथे *'रीरी पितळ'* असा शब्द आला आहे.

## २. मोकळे दृष्टांत

श्रीचक्रधरप्रभूंनी निरूपणाच्या ओघात अनेक दृष्टांत सांगितले. त्यातील महत्त्वाच्या अशा एकशेचौदा दृष्टांतांचे (चौदोत्तर सते दृष्टांत) केशिराजव्यासांनी संकलित केले आहेत. यातील एकही दृष्टांत केशिराजव्यासांनी स्वत: रचलेला नाही हे केशिराजव्यासांनी या दृष्टांतांचे स्तोत्र रचिले आहे यावरून अगदी सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे. कुणीही सुसंस्कृत मनुष्य स्वत:च रचिलेल्या दृष्टांतांचे स्तोत्र करणार नाही हे उघड आहे.[२] या दृष्टांतपाठात न आलेले श्रीमुखीचे इतर दृष्टांत 'मोकळे दृष्टांत'

म्हटले जातात. या मोकळ्या दृष्टांतांच्या दोन तालिका प्रकाशित झाल्या आहेत. त्या अशा :

१. व. दि. कुलकर्णी यांची तालिका[३]
२. यू. म. पठाण यांची तालिका[४]

या दोन्ही तालिकांमध्ये ९४वा दृष्टांत हा 'रीरी पितळेचा' दृष्टांत आहे.

### ३. लक्षणबंदातील उल्लेख

सूत्रपाठातील संसरण प्रकरणातील २० क्रमांकावरचे सूत्र असे[५]

मग जीवुः नाही तेचि गंधर्वनगराकार
अष्टधा प्रकृति रचिः तियेमाजी रीगेः
तादात्मकु होएः प्रकृतिरहं ऐसे बूझेः

यावरील लक्षणबंदातील भाष्य असे[६]

'ना तरि आठांचा कर्दम एकचि असता
अवघियांचा एक वर्ण सारखा नसौवि
विचित्र वर्ण मळांचे कां पा जालेः
ना मायेचिने सामर्थ्ये मळपरत्त्वे
भुतांची भागोत्री अनुशंगिक-प्रधान
होत जाएः तेणे तया कर्दमाचा वर्ण पालटेः
तरि तोचि कैसाः ना जैसे तांबियान
कथील पडेः तेणे कांशे होएः तथा
खापरसुतांतव तांबेयाचे पीतळ होएः
मग जैसी भागोत्री देईनेः तैसे तैसे
पीतळ नीफजेः *जैसे सोनपीतळः तथा रीरीः*
रासवटः तेणे न्याये.......................'

येथे रीरी हा शब्द आला आहे. रीरी आणि सोनपीतळ हे शब्द या उताऱ्यात समानार्थी वाटतात. तेव्हा रीरी म्हणजे सोनपीतळ अथवा पितळ हा अर्थ उपलब्ध होतो. यासाठी उपोद्बलक पुरावा पुढे नोंदवित आहे.

### ४. अपभ्रंश भाषेतील ग्रंथाची साक्ष

संस्कृत भाषेप्रमाणेच अपभ्रंश भाषेतील साहित्य संपदाही अपरंपार आहे. अशा

काही ग्रंथांचा परिचय पां.दा. गुणे यांनी करून दिला आहे.[७] गुणे यांनी या लेखात महेश्वर सूरि नामक ग्रंथकाराच्या 'संयममंजरी' नामक ग्रंथाचा परिचय दिला आहे. या ग्रंथावरील टीकेची प्रतच संवत् १५६१ (इ.स. १५०४)ची आहे. महेश्वर सूरीच्याच 'कालकाचार्यकथा' या ग्रंथाची प्रत संवत् १३६५ (इ.स. १३०८)ची आहे. तेव्हा महेश्वर सूरि हा इसवी सनाच्या बाराव्या शतकात (इ.स. ११६० सुमार) होऊन गेला असावा. या ग्रंथात पुढील मजेदार श्लोक येतो :

*दिवसि पहिल्लइ पाहूणउ*
*सोनासमु वीकाइ ।*
*बीजइ सोनइ पालटइ*
*तीजजइ रीरीघाइ ॥*

– पहिल्या दिवशी पाहुणा सोन्यासारखा विकतो. दुसऱ्या दिवशी त्याची कळा पालटते. तिसऱ्या दिवशी त्याचे पितळ होते.

येथे स्पष्टपणेच रीरी म्हणजे पितळ हा अर्थ निघतो. तेव्हा रीरी म्हणजे पितळ हे स्पष्ट दिसते. रीरी पितळ हा अनुवाद – जोडशब्द असावा. यात दोन भिन्न भाषांतील शब्दांची जोडी असते. जसे अर्जविनंती (पर्शियन, संस्कृत), कोलदांडा (कानडी, मराठी), पैसाअडका (मराठी, कानडी). तसाच रीरीपितळ (रीरी-अपभ्रंश, पितळ-मराठी) हा अनुवाद – जोडशब्द दिसतो. या चर्चेला प्रेरणा दिल्याबद्दल परम पूजनीय तपस्विनी सुभ्रदाबाई कपाटे (पूजनीय आत्या) यांच्या चरणी नम्र अभिवादन करतो.

१. म्हाइंभट, लीळाचरित्र. संपादक वि.भि.कोलते, आवृत्ती तिसरी, पूर्वाध; लीळा ५८४.
२. ब्रह्मानंद देशपांडे, महानुभावीय शोधनिबंध, खंड १ला, पृ. ५४-६९.
३. मराठी संशोधन, ४, पृ. १४३-१४५.
४. महानुभाव, जुलै १९८४, पृ. २९-३१.
५. सूत्रपाठ., संपादक राजधर बाबा महानुभाव, महानुभाव आश्रम, संवत्सर, संसरण, सूत्र २०.
६. दत्तराज मराठे., लक्षणबंद, संपादक वि.भि. कोलते, पृ. १७४.
७. भारत इतिहास संशोधन मंडळ., सप्तसंमेलन – वृत्त, शके १८४१ (इ.स.१९१९), पृ. १५५-१६१. ■

'ऐतिहासिक', १४, अनुपम वसाहत, श्रेयनगर, औरंगाबाद, ४०१००५.
दूरध्वनी ०२४०-२३३६६०६

# मराठीच्या शिक्षणाची दुरवस्था

मंगला गोडबोले

१४ व १५ ऑक्टोबर २००५ ह्या काळात पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाने आणि मराठी अभ्यास परिषदेने 'माध्यमिक व उच्च माध्यमिक परीक्षांमधील मराठी विषयाची दुरवस्था : कारणे आणि उपाय' ह्या विषयावर एक चर्चासत्र आयोजित केलेलं होतं. २००५ सालच्या शालान्त परीक्षेत मराठी विषयात मुलं नापास होण्याचं प्रमाण हे धक्कादायक आणि धोकादायक पातळीवर पोचलेलं होतं. गेली काही वर्षं ही घसरण सातत्याने सुरू आहे; पण आता पाणी डोक्यावरून चाललं. अशा वेळी अध्यापक – भाषातज्ज्ञ-शिक्षणतज्ज्ञ, पालक अशा सर्वांनी एकत्र येऊन त्यावर काही विचारमंथन करावं असा हेतू होता. '१०वी/१२वीची परीक्षापद्धती' 'अध्ययन-अध्यापन प्रक्रिया', 'भाषेच्या पाठ्यपुस्तक निर्मितीचं स्वरूप आणि समस्या', 'भाषाशिक्षणाचे मानसशास्त्र', 'पाठ्यपुस्तकातील कवितांचे अध्यापन', 'स्वभाषा अध्यापनासाठी सुयोग्य परीक्षापद्धती', 'शुद्धलेखन-व्याकरण-निबंधलेखन' अशा वेगवेगळ्या विषयांवर तज्ज्ञांनी निबंध वाचावेत व इतरांनी चर्चा करावी अशी एकूण योजना होती. विषयाचा आवाका मोठा होता तसेच बोलावलेले वक्ते, चर्चक हेही खूप व्यापक शिक्षणानुभवातले होते. त्यात पुण्याच्या 'अक्षरनंदन'सारख्या काहीशा उच्चभ्रू – प्रायोगिक शाळेतले शिक्षक होते तसंच फलटणच्या कमला निंबकर बालभवनच्या स्वामिनी रुद्रभटे ह्यांच्यासारख्या निमशहरी भागातल्या शिक्षिकाही होत्या. डॉ. अशोक केळकर, डॉ. लीलाताई पाटील असे ज्येष्ठ भाषातज्ज्ञ, शिक्षणतज्ज्ञ होते त्याचप्रमाणे 'मित्र मराठी शाळांचे' हा गट स्थापणारे काही पालकही होते. मराठी विभागातले विद्यार्थी, भाषाप्रेमी हेही निमंत्रितात होते.

डॉ. अशोक केळकर ह्यांनी सुरुवातीलाच परिस्थितीचं गांभीर्य भेदकपणे समोर आणलं. केवळ मराठीच्याच नव्हे; तर तथाकथित उपजीविकेच्या गरजेच्या मानल्या जाणाऱ्या इंग्रजीच्याही शिक्षणाची परिस्थिति किती गंभीर आहे हे त्यांनी सोदाहरण दाखवून दिलं. आणि सर्व पातळ्यांवरून एकात्मिक ठोस उपाय योजले जायला हवेत असा आग्रह धरला. 'आपण अखेरीस निरक्षरांची लोकशाही निर्माण करणार नाही ना ?' हा डॉ. पाटील ह्यांचा प्रश्नही भेदक होता.





अनुक्रमणिका

माझ्यासारख्या भाषाप्रेमी पण भाषाशिक्षणाशी दूरान्वयानेही संबंधित नसलेल्या व्यक्तीला ह्या चर्चासत्रातून काय मिळालं ? पहिली गोष्ट म्हणजे व्यवस्थापनाच्या दृष्टीने शाळाकॉलेज भाषाशिक्षणाकडे कसं बघतात हे जाणवलं. अनेक शिक्षक पोटतिडीकीने सांगत होते, की स्वतःच्या पदवी परीक्षेसाठी भाषा विषय नसलेल्या शिक्षकांना अनेकदा नाइलाजाने भाषेचा तास घ्यावा लागतो. नोकरी देतांनाच, जरूर पडेल तेव्हा, मराठी आणि इंग्रजी शिकवावं लागेल अशासारखा इशारा दिलेला असतो. शाळेत कोणत्याही अडचणीला कधीही भाषेचा तास बळी दिला जातो. शाळेत प्रदर्शन भरो, जादूचे प्रयोग - सिनेमा असो, किंवा शाळेत इतर परीक्षांचं केंद्र असो, गणित आणि विज्ञानाचा तास कधीही रद्द होत नाही. मराठीचा तास गेला तरी चालेल ! ह्या सगळ्यातून भाषेचं स्थान दुय्यम आहे, असा संस्कार केला जातो. भाषा उपजतच येते, ती शिकवावी लागत नाही, कोणीही शिकवली तरी चालते, भाषा चांगली येण्या-न-येण्यानं आयुष्यात फार फरक पडत नाही. अशी विद्यार्थ्यांची मनोभूमिका तयार होते. बहुतेक विद्यार्थ्यांना व्याकरण, निबंधलेखन अप्रिय असतं. मुलं व्याकरण तोंडपाठ करतात किंवा खुशाल 'ऑप्शन'ला टाकतात. मुलांनी (विशेषतः मुलग्यांनी) मराठी भाषेची जास्त रुची दर्शवली किंवा तिच्यात उच्च शिक्षण घेण्याचा नुसता विचारही केला तरी पालक धास्तावतात. 'हे कुठले भिकेचे डोहाळे सुचलेत ?' असा त्यांचा भाव असतो आणि ते आपल्या पाल्याला निकराने परावृत्त करतात. मराठीच्या पाठ्यपुस्तकांबाबत बऱ्याच शिक्षकांमध्ये नाराजी दिसली. त्याची कारणं तीन : (१) पुस्तकांची अनावश्यक लांबी. (२) पुस्तकांमधले वेचे निवडतांना येणारे अप्रस्तुत दबाव आणि त्यामुळे ढासळणारा तोल. (३) पद्यपाठांची अप्रस्तुतता.

संतवाङ्मय-पंतवाङ्मय - शाहिरी-वाङ्मय - बखरी-अव्वल इंग्रजीचा काळ - अशा टप्प्यांनीच भाषेची पुस्तकं विसाव्या शतकापर्यंत आणली जातात. ह्यामुळे पाठांची संख्या सालोसाल वाढत जाते. शिकवण्याचा वेळ कमी पडतो. शंभर-दीडशे विद्यार्थी-संख्येला एखादी तरल भावकविता शिकवणं जवळजवळ अशक्य होतं. वस्तुनिष्ठ प्रश्नपद्धतीमुळे पाठातले शब्द-कल्पना-विचार जसेच्या तसे उतरवण्याला जास्त प्रोत्साहन दिलं जातं. पाठ्यपुस्तकातलं आपल्या विद्यार्थ्यांनी किती काय ग्रहण केलं आहे ह्याचं मूल्यमापन करायला शिक्षकांनाही वेळ आणि संधी फार कमी मिळते. भाषेकडून समाजाकडे आणि समाजाकडून संस्कृतीकडे मुलांना नेणं असा प्रवास व्हावा असं काही शैक्षणिक पर्यावरणच दिसत नाही, ह्याबाबत बऱ्याच शिक्षकांचं एकमत दिसलं.

मराठी विषयाची प्रश्नपत्रिका हीही अनेकांना अडचणीची गोष्ट वाटत असल्याचं जाणवलं. आजच्या काळात 'वृत्तं' इ० शिकवायला हवीत का ? पत्रलेखनासारखा

काहीसा कालबाह्य लेखनप्रकार अजूनही आग्रहाने नेमावा का ? जाहिरात - लेखन किंवा दृश्य माध्यमासाठी लिहिणं ह्या आधुनिक काळातल्या गोष्टी जुन्या प्रश्नांना पर्याय म्हणून नव्याने सुरू कराव्यात का ? प्रश्नपत्रिका ही स्मरणशक्तीवर कमी आणि कल्पनारम्यता, लालित्य ह्यावर जास्त भर देणारी असावी का ? भाषा ही जर बोली आणि लेखी असेल तर परीक्षा फक्त लेखीच असणं पुरेसं आहे का ? (टीप : नव्या वर्षापासून मौखिक परीक्षेचा अंतर्भाव करण्याचा प्रस्ताव आहे.) बोलीभाषा आणि प्रमाणभाषा ह्यांचं शिक्षणातलं स्थान/परस्परप्रमाण किती, काय असावं ? शासकीय धोरणानुसार एकच क्रमिक पुस्तक पुण्यामुंबईच्या आणि गडचिरोलीच्याही दहावीच्या विद्यार्थ्याला वापरायचं असेल तर त्यातली सांस्कृतिक कसरत कोणी, कशी पेलावी ? ह्या सर्वांपेक्षा जास्त मूलभूत प्रश्न भाषाशिक्षणामधल्या अतिसुलभीकरणाचा आहे. मुलांना सहज कळावं, कठीण वाटू नये म्हणून सारखं सगळं सोपं-सुखद-आधुनिक भाषेतलं देत गेलो तर आपलं संपन्न साहित्यसंचित त्यांच्यापर्यंत कसं पोचेल ? दुसऱ्या बाजूने आपण मौल्यवान म्हणून जो साहित्यिक ठेवा त्यांना उमेदीने देऊ तो त्यांना कठीण, दुर्बोध वाटला आणि त्यांच्या मनात अरुची निर्माण झाली तर आपण काय मिळवू ? शिक्षणात आनंद हवा तसंच आव्हानही हवं ह्याचं तारतम्य कसं ठेवता येईल हा तो प्रश्न आहे.

शेवटी विद्यार्थी हा दिवसाचे काही तास, वर्षाचे काही दिवसच शिक्षकांच्या सान्निध्यात असतो; पण पालकांचं साहचर्य त्याला खूप जास्त मिळतं. ह्यादृष्टीने पालकांची भूमिका किती महत्त्वाची आहे ह्याकडेही अनेकांनी लक्ष वेधलं. पालक स्वत: वाचतात का? मुलांना वाचून दाखवतात का ? मुलांना सहज-उत्स्फूर्त संवादाला वाव देतात का? प्राथमिक शिक्षण मातृभाषेतच द्यावं असा रास्त आग्रह धरतात का? मुलांना त्या त्या वयाच्या टप्प्यावर योग्य ते शिक्षणेतर वाचनसाहित्य पुरवतात का ? भाषिक खेळ ही कल्पना आपल्याकडे कितपत परिचयाची, रुजलेली आहे ? परकीय भाषेची शुद्धाशुद्धता आणि मातृभाषेची शुद्धाशुद्धता ह्यात खुद्द पालक फरक करतात का ?

असे असंख्य प्रश्न त्या दोन दिवसात मला ऐकायला मिळाले. उत्तरं क्वचितच मिळाली. कोणत्याही चर्चासत्रात असते तशी वेळेची टंचाई होती. त्यामुळे फार गंभीर चर्चाही झाल्याचं दिसलं नाही. भाषाशिक्षण आणि एकूण शिक्षण ह्यात अनेकांनी सरमिसळ केली. इंग्रजी माध्यमाची चलती, टक्केवारीचं वाढतं स्तोम असे मुद्दे एकूण व्यवस्थेशी संबंधित आहेत. शिक्षकांचं अज्ञान, अनास्था, संवेदनशून्यता ह्यावरही बोललं गेलं; पण हा प्रश्न सर्वच शिक्षणाला (खरं तर, आपल्या सर्व समाजजीवनाला) लागू होणारा आहे. तसंच आपल्याकडे बालसाहित्याची उपेक्षा होते. वयानुरूप वाचनसामग्री (ग्रेडेड रीडिंग मटीरियल) उपलब्ध करून दिली जात नाही, बाल्य आणि तारुण्य

ह्यांच्यामधल्या संधीकालासाठी (ॲडोलेसन्स)चे वाचनयोग्य साहित्य नसतं ह्यासारखे काही मुद्दे मागे राहिले असंही वाटलं. तरीही एक सामान्य पालक-नागरीक आणि भाषाप्रेमी म्हणून एक गोष्ट प्रकर्षाने जाणवली ती नोंदवते.

आपले शिक्षणखाते – सरकार – हे सत्ताधारी लोक शैक्षणिक धोरणं वरचेवर बदलतात. त्यामध्ये सातत्य नसतं, दूरगामी विचार नसतो. तात्कालिक लोकप्रियता पटकावण्याचा मोह फार असतो. इंग्रजी पाचवीपासून सुरू की आठवीपासून, संपूर्ण मराठी माध्यम – फक्त गणित व विज्ञानासाठी इंग्रजी माध्यम – संपूर्ण इंग्रजी माध्यम ह्यातले हेलकावे, तोंडी परीक्षा मधूनमधून घालणे व काढणे, शुद्धलेखनाचा आग्रह धरणे किंवा सोडणे, मातृभाषा – शिक्षणात 'लोअर' मराठी - 'हायर' मराठी असे काठिण्यस्तर लावणे अशा अनेक बाबतीत धोरणं बदलत असतात. दर वेळेस नवनव्या तज्ज्ञांच्या समित्या निर्णय घेतात. पण त्या निर्णयांचे वास्तवातले परिणाम बघण्याइतका वेळ दिला जात नाही. ह्यातून एकेका पिढीच्या जडणघडणीशी - सांस्कृतिक विकासाशी खेळ होतो. दुसरी गोष्ट म्हणजे बदलत्या सामाजिक पर्यावरणातले भाषा – शिक्षणाचे प्रश्न आणखी कठीण होणार आहेत. पाल्याचा एक पालक अमराठी असणे, तो नुसता परभाषिक नव्हे; तर परदेशीय-परभाषिकही असणे, अमराठी मुलखात राहावे लागणे, अमराठी शिक्षकाकडून मराठी शिकवले जाणे ह्यासारखे काही प्रश्न आत्ताच वाढू लागले आहेत. अशावेळी त्या पाल्याला/विद्यार्थ्याला मराठीची कोणती शिदोरी आपण देऊ शकू हा गंभीर प्रश्न आहे. ह्या 'पुढच्या हाका' सावधपणे ऐकून त्यासंबंधीही जबाबदारीनं पावलं उचलणं हे आधुनिक भाषाशिक्षणापुढचं आव्हान आहे. ■

७, गीताली, पी.वाय.सी., पुणे ४. दूरध्वनी : २५६७५५३४

---

## शुद्धलेखण डोंगे परी आषय नोहे डोंगा !

वाक्याचा अर्थ बदलनार णसेल तर भाषेवर वीषयांच्या ऊतरत्रीकातिल स्पेलींग कींवा शूद्धलेखणाच्या चूकांकडे दूरलक्ष करूण वीद्यारथ्याना दीऴासा देन्याचा वीचार शीक्शनक्षेत्रात चालु आहे हि '(सकाळ' दीनांक १२) बातमि वाचुण खुप खुप आणंद वाटला. ऊतरातिल आषय बरुबर आसेल तर वीद्यारथ्याना स्पेलींग कींवा शूद्धलेखणाच्या चूगांचा फटका बसु णये या द्रूढ होवू पाहनाऱ्या वीचाराचे परतेक मराठिप्रेमि मानुस मणापासुण स्वागतच करिल. आसा नीर्नय घेन्याला राज्य सर्कारच्या माण्यतेचिहि अवशक्ता णाहि हि तर अधीकच आणंदाची गोस्ट. शीक्शनक्षेत्रात आसा अधीकृत नीर्नय होअिल तव्हा होअिल, पन त्यामूळे आजच समस्थ मराठि माइबोलिप्रेमि जन्तेला परमहर्श झाला आहे. (मजकूरातील आशय बराबर आसेल तर वाचकणि कअुपा करुण शूद्धलेखणाच्या चूका शम्य माणूण त्यानच्याकडे दूर लक्ष करावे हि नर्म वीणंती.) केशव जाधव, संगमनेर. दै. सकाळ, २३-१०-२००५

---

**आदरांजली**

# स्मृतिशेष किसनराव होळकर

**संजय गोडबोले**

[मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारिणीचे सभासद किसनराव होळकर यांचे १९ डिसेंबर २००५ रोजी निधन झाले.]

किसनराव होळकर हे मूळचे उस्मानाबाद जिल्ह्यातील वाशीचे. त्यांचा जन्म २५ सप्टेंबर १९४० रोजी एका वीरशैव कुलवंत वाणी समाजात झाला. शालेय शिक्षण बार्शीला झाल्यावर त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण पुण्याच्या फर्ग्युसन महाविद्यालयात झाले. बी.एस्सी. झाल्यावर कराड येथून त्यांनी बी.ई. सिव्हिल ही पदवी मिळवली. यानंतर सरकारी नोकरीनिमित्ताने पुण्यात त्यांचे अधिक वास्तव्य झाले.

शालेय जीवनापासून होळकर हे हुशार विद्यार्थी म्हणून प्रसिद्ध होते. त्यांना वाचनाची आवड होती. ते निसर्गचित्रे काढत असत. पुढे त्यांना नकाशाशास्त्राची आवड निर्माण होऊन ते नकाशांचे रेखाटन करू लागले. १९६५ सालापासून त्यांनी दुर्मीळ पुस्तके व नकाशांचा संग्रह करण्यास सुरुवात केली व त्या निमित्ताने देशभर खूप भटकंतीही केली. त्यांच्या संग्रहात भारतातील बहुतेक राज्ये व त्यातील जिल्हे यांचे नकाशे व टोपोशीट होते. याचबरोबर जिल्हा सेन्सस, ब्रिटिश काळातील जुने नकाशे, गॅझेटियर व राजपत्रे यांचा संग्रह त्यांनी केला होता. त्यांच्या संग्रहात सुमारे तीन हजार नकाशे होते. तसेच दहा हजारपेक्षा जास्त संदर्भग्रंथ होते. यात मुख्यत्वेकरून इतिहास, भूगोल, योग, आयुर्वेद, सामाजिक विज्ञान, साहित्य यांच्याशी निगडित असंख्य दुर्मीळ पुस्तके होती. निव्वळ पुण्यासंबंधी १९व्या व २०व्या शतकात प्रसिद्ध झालेली त्यांच्याकडे १४५ पुस्तके होती. तसेच रेल्वेची अनेक वेळापत्रके त्यांच्याकडे होती. पुस्तकांव्यतिरिक्त टपालतिकिटे व नाणी यांचाही संग्रह त्यांनी केला होता.

पुस्तकांचा संग्रह वाढू लागल्यावर त्यांना मोदीखान्यातील घर लहान पडू लागले. छोट्या जागेत मांडण्यांवर मांडण्या ठेवून त्यांनी पुस्तके ठेवली होती. पुढे तर थेट स्वयंपाकघरातही पुस्तकांची मांडणी स्थानापन्न झाली. हा सर्व संग्रह करताना होळकरांना त्यांच्या पत्नीची मोठी साथ लाभली. पुस्तकांच्या मांडण्यांमुळे जेमतेम एका खाटेपुरती





अनुक्रमणिका

जागा त्यांच्या पहिल्या खोलीत शिल्लक राहिली होती. शिडी लावून होळकर मांडणीवर पुस्तके ठेवत. कुठले पुस्तक कुठे आहे हे त्यांना उत्तमरीत्या ठाऊक असे. होळकरांचे एक वैशिष्ट्य म्हणजे प्रत्येक पुस्तकावर ते पुस्तक किती तारखेला व किती वाजता विकत घेतले याची ते नोंद करत. एका दिवशी जर एकापेक्षा जास्त पुस्तके घेतली तर दिनांकाबरोबर क्रमांकही पुस्तकांवर ते नोंदत असत. होळकरांना रोज डायरी लिहिण्याची सवय होती. १९६२ सालापासून रोज लिहिलेल्या या डायऱ्या त्यांच्याकडे होत्या. निधनापूर्वीच्या दिवसांपर्यंत त्यांनी डायरी लिहिली होती. बंगळूरला आकस्मिक निधन झाल्याने त्यांच्या डायरीवरूनच त्यांच्या तेथील कार्यक्रमाची कल्पना त्यांच्या नातलगांना समजली.

किसनराव होळकर पाटबंधारे विभागात नाशिक येथून कार्यकारी अभियंता पदावरून सेवानिवृत्त झाले. उजनी, कोयना प्रकल्पांच्या उभारणीत त्यांचे योगदान होते. संकल्प चित्रकार म्हणून त्यांचा हातखंडा होता. तालुक्याचा नकाशा त्यांनी प्रथम तयार केल्याने वाशी तालुका निर्मितीमध्ये त्यांचा सिंहाचा वाटा होता. समाजकार्याची आवड असलेल्या किसनराव होळकर यांनी सामूहिक विवाह सोहळा व वधूवर मेळावेही आयोजित केले होते. पुणे येथे नकाशांचे एक संग्रहालय उभारण्याचा त्यांचा विचार होता. पण ते शक्य न झाल्याने त्यांनी आपल्या गावी वाशी येथे सर्व संग्रह हलवला व आज पाच खोल्यांत सुमारे ४० मांडण्यांवर हा संग्रह ठेवला आहे. निवृत्त झाल्यानंतर त्यांनी वाशी व परिसरातील पुरातन वास्तू, मंदिरे यांचा शोध घेऊन त्यांची माहिती संकलित करण्याचा छंद जोपासला होता. मराठी भाषेवर त्यांचे निस्सीम प्रेम होते. वाशी तालुक्याचा भौगोलिक नकाशा त्यांनी १५ वर्षांपूर्वी तयार केला होता. त्याचा फायदा आजही तेथील ग्रामस्थांना होतो. २००२ सालानंतर वीरशैव कुलवंत वाणी समाजाचे गॅझेटियर तयार करायचा विचार त्यांच्या मनात आला, तेव्हा त्यांनी विविध समाज, उत्सव, संस्कार, कार्यक्रम, विवाह अशा अनेक प्रसंगांचे छायाचित्रण सुरू केले व त्याचे अल्बम तयार केले. एक मांडणी भरून आज या अल्बमचा संग्रह तयार झाला आहे. दिवसा प्रवास करून रात्री माहितीच्या नोंदी करायचे काम त्यांनी सुरू केले. ते स्वत: संगणकाचे कार्य शिकून त्याचा वापर करू लागले. संगीताच्या व माहितीच्या सीडीजचा संग्रहही त्यांनी सुरू केला होता. स्वत:च्या नोकरीच्या कामात एक नि:स्पृह, कार्यक्षम व निष्कलंक अधिकारी म्हणून त्यांनी ख्याती मिळवली होती. वाशीला जाणे येणे असले तरी निवृत्तीनंतर ते पुणे येथेच राहात. त्यांच्या निधनानंतर वाशी येथील व्यापाऱ्यांनी एक दिवस व्यवहार बंद ठेवून त्यांना श्रद्धांजली वाहिली. ■

दै. लोकसत्ता, ७-१-२००६

---








अनुक्रमणिका

**पुस्तक-परीक्षण**

# दिलासा देणारा वाङ्‌मयकोश

**विद्यागौरी टिळक**

[परीक्षित ग्रंथ : 'मराठी वाङ्मयकोश - खंड चौथा - समीक्ष-संज्ञा'. संपा. डॉ. विजया राजाध्यक्ष, म.रा.सा.सं.मंडळ, मुंबई ४०००१४. प्रथमावृत्ती, नोव्हेंबर २००२, पृ. ४५०, किंमत रु. ३२०/-]

कोणतीही भाषा ही समर्थ ज्ञानभाषा बनविण्याच्या दृष्टीने कोशकार्याचे महत्त्व निर्विवाद आहे. मराठीच्या संदर्भात हे काम व्हावे त्या गतीने होत नसल्याची खंत अनेकदा व्यक्त केली जाते. या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळातर्फे प्रकाशित झालेल्या मराठी वाङ्‌मयकोशाच्या चौथ्या खंडाचे - अर्थात समीक्षा-संज्ञा कोशाचे स्वागतच केले पाहिजे.

म. रा. सा. सं. मंडळाने प्रस्तुत कोशाची योजना १९६९ मध्ये हाती घेतली होती. ती अनेक कारणांनी रेंगाळली. दरम्यान मंडळ व कोशकार्यातील सहभागी लोकही बदलत गेले. इ. स. १९९३मध्ये म.रा.सा.सं. मंडळाचे तत्कालीन अध्यक्ष डॉ. य. दि. फडके यांनी डॉ. विजया राजाध्यक्ष यांना कोशाच्या संपादनाची धुरा स्वीकारण्याची विनंती केली. नंतरच्या काळी अध्यक्षपदी आलेल्या निरनिराळ्या व्यक्तींनीही त्यासाठी त्यांना पाठबळ दिले व परिणामी हे कार्य सिद्धीस गेले. इ.स. २००२च्या अखेरीस हा खंड प्रकाशित झाला. डॉ. विजया राजाध्यक्ष या कोशाच्या समन्वयक संपादक आहेत. संपादनामध्ये त्यांना साहाय्य करणाऱ्या संपादन मंडळात कै.मे.पुं. रेगे यांच्यापासून राजीव नाईक यांच्यासारख्या नव्या पिढीतील अभ्यासकापर्यंत विविध विषयांमधील तज्ज्ञांची नावे दिसतात. ती पाहता हे संपादन मंडळ पुरेसे प्रातिनिधिक म्हणता येईल, असे आहे. विविध लेखकांनी लिहिलेल्या नोंदी तपासताना एकेक नोंद त्या त्या क्षेत्रातील तज्ज्ञाने तपासली. काही नोंदी वेगवेगळ्या क्षेत्रांशी संबंधित असल्याने तीन-तीनदाही वाचल्या गेल्या, असे प्रस्तावनेत नमूद केले आहे. नोंदी यथायोग्य व्हाव्यात यासाठी झालेल्या नोंद-लेखकांच्या कार्यशाळांचाही उल्लेख त्यात आहे. विविध विषयांमधील अनेक तज्ज्ञ अभ्यासकांनी एकत्रितपणे कसे व किती काटेकोरपणे काम

करायला हवे, याचे पुढच्या काळातील कोशकर्त्यांसाठीचे उत्तम मार्गदर्शन या प्रस्तावनेतून मिळते. आपल्याकडे सामूहिकपणे अशा तऱ्हेचे काम करण्याचा प्रघात ज्ञानक्षेत्रामध्ये फारसा रुजलेला नाही. त्यामुळे हे मुद्दाम नोंदवावेसे वाटते.

प्रस्तुत संपादकांकडे ही जबाबदारी येण्यापूर्वी आधीच्या संपादकांनी काही रूपरेषा आखलेली होती आणि त्या दिशेने लेखकांकडून नोंदी लिहवून घेण्याचे कामही पुष्कळसे झालेले होते. अशा परिस्थितीत पुन्हा पहिल्यापासून नव्याने प्रारंभ करण्याऐवजी आधीच्या नोंदींचा यथायोग्य वापर व्हावा, अशी भूमिका त्यांनी घेतली; ती उचितच म्हणावी लागेल. त्यामुळे माजी संपादक प्रा. म.वा. धोंड, भूतपूर्व संपादक कै. प्रा. वा.ल. कुलकर्णी, कै. प्रा.र.पं. कंगले यांच्याकडून मिळालेल्या जुन्या नोंदींपैकी बऱ्याच पुनर्लेखन, संपादकीय संस्कार, पुरवण्यांची जोड देणे असे करून कोशात घेतलेल्या आहेत. बऱ्याच नव्यानेच समाविष्ट केलेल्या आहेत. कोशाच्या प्रथमावस्थेतील कामानंतर वाङ्मय व समीक्षा व्यवहारात झालेली स्थित्यंतरे लक्षात घेता हे अपरिहार्य होते. अशा प्रकारे वेगवेगळ्या कालिक टप्प्यांवर, भिन्न आलोक ठेवून लिहिलेल्या नोंदींचे एकत्रित कोशस्वरूपात संपादन करणे, ही गोष्ट खरोखरीच कठीण आहे. कोशकार्यावरील निष्ठा, अभिनिवेशविरहीत दृष्टिकोण अशासारख्या गुणांची त्याला अत्यंत गरज असते.

पहिल्या रूपरेषेमध्ये सुरुवातीच्या संपादकांनी जो आराखडा स्थूलमानाने दिलेला होता, तो कोशाच्या पूर्ततेसाठी कायम केलेला दिसतो. मराठी वाङ्मय व समीक्षाक्षेत्रावर असलेला संस्कृत व इंग्रजी संकल्पनांचा प्रभाव पाहता त्यातील अनेकांचा अंतर्भाव कोशात करावा लागणार हे गृहीत प्रारंभिक आराखड्यात होते. ते नंतरच्या तीसेक वर्षांमध्येही बदललेले नाही. (उलट त्या वेळी संपादकांनी 'सविकल्प समाधी'सारख्या मराठीत उदयाला आलेल्या संकल्पनेचा मुद्दाम उल्लेख केलेला आहे. परंतु कोशामध्ये प्रत्यक्षात त्यावर नोंदच नाही. त्यामुळे आज ती संकल्पना मराठी साहित्यविचारातून बाजूलाच पडली आहे किंवा कसे, असा एक प्रश्न उद्‌भवतो.) परंतु संस्कृत-इंग्रजी संकल्पनांचे वर्चस्व कायम असले, तरी त्यात फरक पडलेला आहे. संस्कृत साहित्यशास्त्राचा प्रभाव आधीच्या कालखंडात विशेषत्वाने जाणवण्याजोगा होता. आज त्याची जागा पाश्चात्यांकडून आपल्यापर्यंत आलेल्या अस्तित्त्ववाद, वाचक-प्रतिसाद सिद्धांत इ० विचारप्रणाली, सिद्धांत व नव्या अभ्यासपद्धतींनी घेतलेली आहे.

सदरहू कोशाच्या मूळ रूपरेषेमध्ये काय काय यावे, याविषयी ज्या दहा गोष्टी- वाङ्मयप्रकार, समीक्षापद्धती, वाद, इंग्रजी साहित्यशास्त्रातील संकल्पना व संज्ञा, संस्कृत साहित्यक्षेत्रातील संकल्पना व संज्ञा इ० – नमूद केल्या आहेत. त्या आजही स्थूलमानाने सुसंगतच ठरतात.

रसविचार, ध्वनीविचार वा नाट्यशास्त्रातील संकल्पना आजच्या अभ्यासकालाही समजावून घेणे गरजेचेच वाटणार. त्यादृष्टीने अशा सर्व नोंदी कोशात समाविष्ट आहेत. यातल्या बहुतेक आधी लिहिलेल्या असाव्यात, असेही जाणवते. काही नोंदींबद्दल मात्र मतभेद होऊ शकतात. उदा० संस्कृतमधील नाट्याचे दहा रूपकप्रकार प्रत्येकाची स्वतंत्र नोंद करण्याइतके मराठी अभ्यासकांच्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत का ? 'डिम' किंवा 'सट्टक' या संज्ञांना त्यांच्या दृष्टीने काय अर्थ ? 'ज्या संज्ञांना शब्दकोशातील अर्था-पलीकडचे अधिक असे समीक्षात्मक संदर्भ नाहीत, अशा संज्ञा वगळल्या' असे प्रस्तावनेत नमूद केलेले आहे. तरीही ज्या प्रकारांची संस्कृतातही उदाहरणे नाहीत, अशा या काही प्रकारांवर नोंदी आहेत; असे दिसते. त्यामुळे आजच्या एखाद्या अभ्यासकाची प्रतिक्रिया संस्कृत साहित्यविचाराला वाजवीपेक्षा झुकते माप मिळाल्याची होऊ शकते. अर्थात काही नोंदी सर्वांना उपयोगी वाटण्याजोग्या नसणे, हा कोशाचा दोष नव्हे. त्या अत्यल्प अभ्यासकांना का होईना, हव्याशा असू शकतात. गरजेची वाटणारी नोंद नसली, तर ती मात्र उणीव ठरू शकते. त्यादृष्टीने हा कोश एकंदरीत समाधानकारक आहे. पाश्चात्य साहित्यविचाराशी संबंधित अशा अनेक नव्या नोंदी समाविष्ट केल्या आहेत. गेल्या दोन-तीन दशकांमध्ये भाषेशी संबंधित अनेक नवे विचारव्यूह पुढे आलेले आहेत. त्यांच्यावरील नोंदी प्रस्तुत कोशात आल्या आहेत. नव्या साहित्य-प्रवाहांवरील नोंदी आहेत, तसेच 'लोकसाहित्या'सारख्या नव्या अभ्यासक्षेत्रांवरही आहेत. 'तेनच्या सिद्धांता'वर स्वतंत्र नोंद हवी होती, असा मतभेद क्वचित ठिकाणी होऊ शकतो. पूर्वोल्लेखित रूपकप्रकारांबाबत लिहिताना 'संधी' या संकल्पनेचा, व मुख, प्रतिमुख इ० संधीच्या प्रकारांचा निर्देश येतो. संधी म्हणजे काय, याचा उलगडा मात्र कुठे होत नाही. 'वृत्ती'वर जशी नोंद येते, तशी 'संधी'वर येणेही उचित ठरले असते. मात्र असे एखाद्याच विषयाबाबत जाणवते. एकंदरीने नोंदींसाठी निश्चित केलेले विषय मराठी साहित्य-समीक्षा व्यवहाराच्या दृष्टीने पुरेसे व्यापक आहेत.

कोशासाठी नोंदी लिहिणाऱ्या अभ्यासकांची विस्तृत यादी (एकूण १२२) प्रारंभीच दिलेली आहे. ती पाहता, कोशकार्यासाठी विविध विषयांमधील व्यासंगी तज्ज्ञांची एक मोठी फौजच इथे उभी राहिलेली दिसते. त्यामुळे नोंदींच्या लेखनामध्येही अपेक्षित दर्जा राखला गेलेला आहे. त्यामध्ये संपादकांचे श्रेयही जाणवण्याजोगे आहे.

काही विषयांवरील नोंदी जुन्या असल्याने त्या त्या लेखकांनी अभ्यासपूर्ण, नेटका मजकूर दिलेला असला, तरी तो पुरेसा ठरला नसता. उदा० 'नाटक-१' ही नोंद केवळ संस्कृत साहित्यशास्त्राच्या दृष्टिकोणातून दिलेली दिसते. 'नाटक-२' व 'नाटक-३' या पूरक नोंदी लिहवून घेतल्यामुळे नाटकाची एक सर्वसाधारण संकल्पना

व प्रायोगिक अंगेही स्पष्ट होतात. काही ठिकाणी एखादी विचारप्रणाली पुरेशी स्पष्ट करण्यासाठी 'पुरवणी'-नोंदही जोडलेली दिसते. उदा० 'अस्तित्ववादा'वरील नोंद.

कोशामध्ये प्रामुख्याने संकलनात्मक, तटस्थपणे परिचय करून देणारी मांडणी अभिप्रेत असते. प्रचलित व सर्वमान्य अशा विचार व तत्त्वांची ओळख करून देणे हा मुख्य हेतू, हे संपादकांनीच नमूद केले आहे. हे मुख्य उद्दिष्ट साध्य करता करता अभ्यासकास योग्य दिशा दाखवण्याचे कामही काही नोंदींमध्ये अतिशय कौशल्याने झालेले आहे. 'भाषा आणि साहित्य' यावरील नोंदींमध्ये साहित्याच्या भाषेचा बारकाव्याने अभ्यास करताना ''ह्या बारकाव्याला साहित्यमूल्यांचे अधिष्ठान पाहिजे. नाहीपेक्षा कला आणि कुसर ह्यांतला फरक आपण गमावून बसू.'' असा इशारा येतो. किंवा 'सौंदर्यभावने'वरील नोंदीत सौंदर्यभावनेचे स्वरूप स्पष्ट केल्यावर सौंदर्यभावना व 'रस'कल्पना यातील साम्याचे दिग्दर्शन होते. वानगीदाखल ही दोन उदाहरणे !

एखाद्या नोंदीमध्ये मात्र हा मूळ लेखनहेतू बाजूला पडून समीक्षात्मक चिकित्सेकडेच कल झुकल्यासारखा वाटतो. 'अनुकृती' सिद्धांतावरील नोंद अशासारखीच म्हणता येईल. प्रत्येक तज्ज्ञ कोशाच्या दृष्टीने उत्तम नोंद लिहू शकेलच, असे नाही, हे सूत्र संपादनकार्यात किती सातत्याने धरून ठेवले पाहिजे, हे अशा अपवादात्मक स्थळांवरून ध्यानात येते. अशा काही त्रुटी जाणवत असल्या तरी एकूण नोंदी अभ्यासपूर्वक, साक्षेपाने लिहिलेल्या आहेत. कोशाच्या अखेरीला विषय-नोंद सूची, इं.-म. व म.-इं. परिभाषा सूची व इंग्रजी, मराठीतील संदर्भ-ग्रंथांच्या विस्तृत सूची जोडलेल्या असल्याने कोशाची उपयुक्तता अधिकच वाढलेली आहे.

कोशाची भाषा या अंगाचा मात्र आपण अधिक बारकाईने विचार करायला हवा आहे, असे या खंडाच्या निमित्ताने जाणवले. जुन्या लेखक-संपादकांनी केलेले परिश्रम वाया जाऊ नयेत, या सद्भावनेने व काम पुढच्या टप्प्यावर नेता यावे, या व्यावहारिक गरजेचा विचार करून आधीच्या नोंदी समाविष्ट केल्या गेल्या. संपादकीय संस्कार केलेले असले, तरीही काही ठिकाणी भाषेचे वळण संस्कृतप्रचुर वाटेल, असे राहते. आजच्या नव्या पिढीतील अभ्यासकांना ही भाषा क्लिष्ट वाटायची शक्यता आहे. त्यांच्या परिचयाची साहित्य-समीक्षा व्यवहाराची परिभाषाही वेगळी आहे. उदा० येथील नाटकातील 'धर्मी' या विषयावरील नोंद वाचली, तर ही 'नाट्यशास्त्रातील पारिभाषिक संज्ञा', हा खुलासा मिळेल. धर्मीचे प्रकार कळतील, पण म्हणजे नेमके काय, याविषयीचे गोंधळ मिटतील असे नव्हे. अशा तत्सम शब्दांची घडण व अर्थ त्यांना अपरिचित आहेत. त्यांच्याशी जुळणारे शब्द प्रचलित भाषासरणीत निराळ्या प्रकारे वापरले जात असतील, तर गोंधळास आणखीच वाव आहे.

नव्याने लिहिलेल्या नोंदींची भाषाही काही ठिकाणी क्लिष्ट होते आहे. 'वाङ्मयविद्या'सारख्या नोंदीमध्ये 'वाङ्मयकृती' व तिचे 'कोंदण' अशा संज्ञा वापरून केलेली मांडणी सुगम होते. ज्ञानभाषा घडवण्याचा प्रयत्न सफल होईलसे वाटू लागते. उलट 'साहित्यिक संज्ञामीमांसा'सारख्या नोंदीमध्ये भाषांतर पद्धतीने परिभाषा घडवण्याचा प्रयास आकलनात अडथळे आणतो. त्यातही 'ब्रॅकेटिंग'ला 'कंसबद्ध करणे' असा प्रतिशब्द घेतला, तर तो 'तात्पुरते बाजूला सारणे' याअर्थी मराठी वाचकाच्या पचनी पडणे अवघड वाटते. त्याला कंसातल्या गोष्टी गृहीत धरण्याची, अंतर्भूत करण्याची सवय नाटके आणि विनोदी लेखनामुळे आहे.

'आजच्या अभ्यासकांची भाषिक क्षमता पुरेशी नसणे', हा स्वतंत्र चिंता आणि चिंतनाचा विषय असला, तरी त्यामुळे कोशातल्या मजकुरात काहीएक सुगमतेची पातळी राखायला हवी, या मुद्याकडे दुर्लक्ष करता येत नाही. अलीकडच्या काळात प्रत्यक्ष व्यवहारातील मराठी भाषा तुलनेने वेगात बदलते आहे. आपली ग्रांथिक भाषा तेवढ्या वेगाने बदलणे अर्थातच शक्य नाही किंवा उचितही नाही. पण अशा तऱ्हेने कोश सिद्ध करण्यासारखी कामे वर्षानुवर्षे रेंगाळत राहिली, तर ही भाषिक दरी अधिक तीव्रतेने जाणवेल, यात शंका नाही. भाषिक अंतर जाणवून, क्लिष्ट वाटून जर अभ्यासक कोशाकडे वळेनासा झाला, तर सगळ्या परिश्रमांवरच पाणी पडल्यासारखे होईल. सर्वसाधारण वापर कमी म्हणून भाषा क्लिष्ट वाटते म्हणून वापर कमी होतो हे दुष्टचक्र ज्ञानव्यवहाराच्या क्षेत्रातील मराठी भाषासरणीने भेदावे, यासाठी या मुद्याची गंभीर दखल घेतली पाहिजे.

समीक्षा-संज्ञा कोशातील मोजक्याच का होईना; पण काही नोंदी भाषेबद्दल असे अंतर्मुख व्हायलाही भाग पाडतात. म.रा.सा.सं.मं.चे कोशाच्या प्रकाशनकाळातील अध्यक्ष प्रा. रा.रं. बोराडे यांनाही या सर्वांची जाणीव आहे. त्यामुळे त्यांनी आपल्या निवेदनात, विलंबामुळे येणारे दोष टाळण्यासाठी हे कार्य विद्यापीठ वा अन्य संस्थांनी हाती घ्यावे, असे सुचवलेले आहे. याच निवेदनात त्यांनी 'कोशाच्या परिपूर्ण नोंदी लिहिणाऱ्या लेखकांची संख्या वरचेवर कमी होत चालल्या'बद्दलचे जे निरीक्षण नोंदवले आहे, तेही चिंतनीय आहे.

मराठीतील कोशकार्याच्या भवितव्याबद्दल विचार करायला लावणाऱ्या अशा काही बाबी वाङ्यकोशाच्या समीक्षा-संज्ञाखंडाच्या निमित्ताने जाणवल्या, तरी त्याने ज्ञानक्षेत्रामध्ये टाकलेली मोलाची भर, अभ्यासकांच्या गरजेची केलेली पूर्तता ध्यानी घेतली, तर मनाला निश्चितच दिलासाही मिळतो. ■

७/३०, 'गौरीनंदन' महेश सोसायटी, बिबवेवेडी, पुणे ३७. दूरध्वनी : २४२१९१२६

पुस्तक-परीक्षण

# प्रचंड आवाका असलेला चरित्रकोश

प्रभा गणोरकर

[परीक्षित ग्रंथ : 'मराठी विश्वचरित्र कोश - खंड १ व २'. प्रमुख संपादक : श्रीराम पांडुरंग कामत, विश्वचरित्रसंशोधन केंद्र, गोवा. प्रकाशनवर्ष अनुक्रमे २००० व २००३, पृष्ठे १०५० व ९५६, किंमत प्रत्येकी रु. १,५००/-]

'विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा' या संस्थेतर्फे 'मराठी विश्वचरित्र कोशा'चे पहिले दोन खंड प्रकाशित करण्यात आलेले आहेत. या कोशाची संकल्पना आणि हा संकल्प पूर्ण करण्याची जिगर श्री. श्रीराम पांडुरंग कामत यांची आहे. 'मराठी विश्वचरित्र कोशा'च्या तोडीचा कोश अद्याप कोणत्याही भारतीय भाषेत रचण्यात आलेला नाही म्हणून हा अनन्यसाधारण असा कोश आहे असे कोशाच्या आरंभीच्या मनोगतात विश्वचरित्र संशोधन केंद्राचे अध्यक्ष प्रा. मे. पुं. रेगे यांनी म्हटले आहे, ते किती यथार्थ आहे हे या कोशाचे पहिले दोन प्रकाशित खंड पाहिले तरी पटते. विज्ञान, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे, धर्म, साहित्य, कला, क्रीडा, उद्योग, व्यापार, राजकारण इत्यादी क्षेत्रांत उल्लेखनीय कामगिरी करून ज्यांनी मानवी संस्कृतीच्या इतिहासावर आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमटविला अशा सर्व, इतिहासाला ज्ञात असणाऱ्या व्यक्तींची चरित्रे प्रस्तुत चरित्रकोशात असावीत असा, संपादक श्रीराम कामत यांचा संकल्प आहे व अथक परिश्रम घेऊन ते तो पूर्ण करतील याची खात्री प्रस्तुत दोन खंडांवरून पटते. अशा प्रकारच्या ग्रंथाचे परीक्षण करणे किंवा स्वत:जवळ असलेल्या थोडक्या तुटपुंज्या माहितीच्या आधारे ग्रंथातील 'चुका' दाखवून त्याचे मूल्यमापन करून संपादकांनी घेतलेल्या परिश्रमाचे अवमूल्यन करण्याचा खटाटोप येथे करावयाचा नसून प्रस्तुत ग्रंथाचा प्रचंड आवाका आणि त्याचे स्वरूप यांचा परिचय करून देणे एवढाच या परीक्षणाचा उद्देश आहे.

सुरुवातीला संपादक श्रीराम कामत यांची प्रस्तावना आहे. प्रथम त्यांनी कोशरचनेच्या इतिहासाचा थोडक्यात आढावा घेतलेला आहे. 'निघंटू' हा सर्वात प्राचीन भारतीय कोश, अमरसिंह विरचित 'अमरकोश', इंग्रजीतील आद्य कोश 'नॅचरल

हिस्टरी', ई. चेंबर्स यांचा 'सायक्लोपीडिया ऑर ॲन युनिव्हर्सल डिक्शनरी ऑफ आर्ट ॲण्ड सायन्सेस', १९६८-७१ या दरम्यान सिद्ध झालेला 'एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका' – ज्याच्या तीन वर्षांत पंधरा आवृत्त्या निघाल्या – अशा विख्यात कोशांचा उल्लेख करून कामतांनी इंग्रजी व जर्मन चरित्रकारांनी संकलित केलेल्या निवडक चरित्रकोशांचीही माहिती दिली आहे. डॉ. केतकरांचा 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश', य.रा. दाते व चिं.ग. कर्वे संपादित 'सुलभ विश्वकोश', प्रथम लक्ष्मणराव जोशी व पुढे मे.पुं. रेगे यांनी संपादित केलेला 'मराठी विश्वकोश', पं. महादेवशास्त्री जोशी यांचा 'भारतीय संस्कृतिकोश' इत्यादी अनेक उल्लेखनीय कोशांची माहितीही त्यांनी दिलेली आहे. मराठीत चरित्रकोश – निर्मितीही विपुल आहे. प्र.न. जोशी यांचा 'शास्त्रज्ञांचा चरित्रकोश', गं.दे. खानोलकर संपादित 'अर्वाचीन मराठी वाङ्मयलेखक' हा साहित्यिकांचा चरित्रकोश या व्यतिरिक्त ल.द. जोशी, शं.ग. दाते, न.र. फाटक, देविदास वाडेकर, प्र.कृ. प्रभुदेसाई, अमरेन्द्र गाडगीळ, स.मा. गर्गे इत्यादींनी संपादित केलेल्या विविध प्रकारच्या कोशांचा उल्लेखही कामतांनी केलेला आहे. कै. रघुनाथ भास्कर गोडबोले यांचा, 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश', व 'भारत खंडाचा अर्वाचीन कोश' या आद्य चरित्रकोशांप्रमाणेच सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचा 'भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोश' व 'भारतवर्षीय मध्ययुगीन चरित्रकोश' या कोशांनी कोशनिर्मितीच्या परंपरेत महत्त्वपूर्ण भर घातलेली आहे याचाही उल्लेख त्यांनी केला आहे. 'असे असले तरी मराठी भाषेत सर्व विषय संग्राहक अशा विश्वचरित्र कोश निर्मितीचा प्रयत्न आजमितीस झालेला नाही किंबहुना कोणत्याच भारतीय भाषांत तो आजवर झालेला नाही' म्हणून तसा प्रयत्न करण्यासाठी प्रस्तुत प्रकल्प हाती घेतल्याचे त्यांनी विनम्रपणे नमूद केले आहे. त्यासाठी, 'विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा' या संस्थेची स्थापना १९७७ साली करण्यात आली. या केंद्राचे पहिले अध्यक्ष कविवर्य बा.भ. बोरकर हे होते.

१९७७ नंतर पुढील पंचवीसहून अधिक वर्षे या विशाल कार्याचा ध्यास बाळगून व स्वीकृत कार्याचे महत्त्व जागून, त्यासंबंधीच्या निष्ठेने अत्यंत परिश्रमपूर्वक, संयम राखून, प्रमुख संपादक श्री. कामत आणि त्यांचे सल्लागार सहकारी संपादक श्री. अ. ना. ठाकूर यांनी जे कार्य प्रत्यक्षात उभे करून दाखवले ते चकित करणारे आहे. आजच्या काळात अशा प्रकारच्या कार्यासाठी यंत्रणा उभी करतानाच दमछाक व्हावी अशी स्थिती आहे. मुख्यतः कोशासाठी नोंदी लिहवून घेणे फारच जिकिरीचे ठरते. सुरुवातीला उत्साहाने प्रतिसाद देणारे नोंदलेखक नंतर काम करतीलच आणि मुदतीच्या आत नोंदी देतील याची शाश्वती नसते. त्यासाठी धीराने व संयमाने पाठपुरावा करावा लागतो. नोंदी मिळवणे, त्या तपासून घेणे, त्यांच्यावर आवश्यक ते संपादकीय संस्कार

करणे, त्यांची मुद्रणप्रत सिद्ध करणे अशा प्रत्येक बाबींसाठी नियोजन तर लागतेच पण माणूसबळही लागते. कामतांच्या सुदैवाने 'मराठी विश्वकोशा'च्या विज्ञान व तंत्रविद्या कक्षाचे निवृत्त संपादक श्री. अ.ना. ठाकूर यांच्यासारखा तज्ज्ञ व अनुभवी सहकारी त्यांना लाभला. या प्रकारच्या कार्यात आर्थिक अडचणींचा मोठाच अडथळा असतो. कामतांच्या चतुरस्र योजकतेने या प्रकारच्या अडचणीवर मात करण्यास चहूबाजूंनी पाठिंबा मिळाला. गोवा शासनाच्या सांस्कृतिक खात्यातर्फे वार्षिक अनुदानाची व्यवस्था झाली. सुमारे २००० नोंदी असलेला १०५० पृष्ठांचा, 'अंगद ते खो–' असा पहिला खंड २००० साली व ९५६ पृष्ठांचा, 'घ ते प्वासाँ सिमेआँ देनिस' एवढा व्याप आवाक्यात घेणारा दुसरा खंड २००३ साली प्रकशित झाला.

इतिहास, तत्त्वज्ञान, साहित्य, कला, क्रीडा, वैद्यकशास्त्र, विज्ञान, तंत्रविज्ञान, संगीत इत्यादी सुमारे ७४० ज्ञानक्षेत्रांतील व्यक्तींचा अंतर्भाव या कोशात करण्यात आलेला आहे. ही निवड करताना व्यक्तीच्या कार्याचे महत्त्व व कीर्ती याप्रमाणेच प्रातिनिधिकतेचाही निकष घेतलेला आहे. (त्यामुळे, 'आमच्यावर नोंद का नाही?' असा आक्षेप घेण्यास महाराष्ट्रातील अनेक साहित्यिकांना व विद्वानांना वाव आहे !) व्यक्तींची निवड करताना रामायण, महाभारतादी काव्यांतील पात्रांची निवड का करण्यात आली असा प्रश्न पडू शकतो. नोंदींची व्याप्ती केवढी असावी याचा निर्णय संपादकांनी नोंदलेखकांवर सोपवलेला असावा असे वाटते. नोंदींच्या खाली नोंदलेखकाचे नाव नमूद केले गेले आहे. ज्यावेळी त्या त्या विषयांतील तज्ज्ञांकडून नोंद मुदतीत लिहून मिळणे दुरापास्त झाले, तेव्हा अनेक संदर्भ ग्रंथांच्या आधारे विश्वचरित्र संशोधन केंद्राने त्या तयार केल्या आणि तज्ज्ञांच्या नजरेखालून गेल्यानंतर त्याच्याखाली 'वि.सं.कें.' असा उल्लेख करण्यात आला. कोशकार्य एकहाती होणे शक्य नसते. विविध क्षेत्रांतील व्यक्तींच्या चरित्रांसंबंधीच्या नोंदी असल्यामुळे विविध क्षेत्रांतील तज्ज्ञ नोंदलेखकांनी नोंदी लिहिलेल्या आहेत. त्या वाचत असताना, बहुधा, संपादकांनी तज्ज्ञ नोंदलेखकांवर संपूर्ण भिस्त टाकली असावी अशी शंका येते. नोंदीची व्याप्ती नोंदलेखकाला केवढी सामग्री मिळवता आली यावर अवलंबून असणे स्वाभाविक आहे. ही सामग्री मिळण्यासाठी कित्येकदा साधने उपलब्ध नसतात; असली तरी चटकन हाताशी नसतात. अशी स्थिती असेल तर साहजिकच नोंद अपूर्ण ठरते. उदाहरणार्थ, ना.सं. इनामदार यांचा जन्म नोंदवला गेला नाही ही नोंदलेखकाच्या लेखनाच्या शिस्तीसंबंधीची बाब असू शकते किंवा संपादकांनाही हा तपशील त्वरित मिळणे कठीण गेल्यामुळे तो राहून गेलेला असू शकतो. (मराठी लेखकांसंबंधी नोंदी लिहिताना माहिती मिळवण्यासाठी केवढी आटाआटी करावी लागते याची कल्पना प्रस्तुत टिपणकाराला

आहे. मराठीतील साहित्यिकांसंबधी फार आत्मीयतेने लिहिले गेलेले परिचयपर लेख किंवा मृत्युलेख हे बव्हंशी आत्मचरित्रपरच असतात.) पण या प्रकारच्या अडचणींमुळे नोंद अपूर्ण राहतेच. गं.दे. खानोलकर यांच्यासंबंधीची नोंद, उदाहरणार्थ, अत्यंत जुजबी आहे. ती हे महत्त्वाचे नाव 'राहून जाऊ नये' या हेतूने झालेली, केवळ नामोल्लेखापुरतीच उतरलेली आहे. म्हणजेच साधनसामग्रीच्या उपलब्धतेवर नोंदीचे सकसपण अवलंबून असते हे अगदी उघडच आहे. पण त्याचबरोबर हेही खरे की नोंदी लिहिणे हे एकप्रकारचे कौशल्य आहे. प्रस्तुत ग्रंथांतील नोंदी, चरित्रकोशातील असल्यामुळे, चरित्रविषयक तपशीलांवर भर देणाऱ्या असणे स्वाभाविक आहे; परंतु व्यक्तींच्या कर्तृत्वालाही महत्त्व आहेच. त्यामुळे नोंदीत कर्तृत्वाचे विशेष येणे आवश्यक ठरते, कर्तृत्वाचा तपशील नव्हे. येथे लेखकाच्या लेखनकौशल्याची कसोटी लागते. नोंदलेखकांना संपादकीय सूचना असूनही नोंदलेखक आपापल्या लेखनस्वभावानुसार नोंदी लिहितात तेव्हा, एवढ्या अवाढव्य कोशांतील नोंदींवर संपादकीय संस्कार करून घेणेही अशक्यप्रायच झाले असणार. त्यामुळे कोश चाळताना काही नोंदी अगदी खडखडीत तपशीलाने भरलेल्या वाटतात. अर्थात वाचकाला कशात रस आहे हे वाचकपरत्वे वेगवेगळे असू शकते. उदाहरणार्थ, चिं.त्र्यं. खानोलकरांवरची नोंद वाचताना खानोलकरांच्या चरित्राचे व लेखनाचे तपशील पुष्कळ आहेत; पण त्यांच्या वाङ्मयीन वैशिष्ट्यांसंबंधी एकही ओळ नाही. याउलट आनंद कुमारस्वामींसंबंधीची नोंद किंवा लहान – आटोपशीर असूनही मिलान कुंदेरा संबंधीची नोंद परिपूर्ण वाटते, तर नामदेव कांबळे (कोशात हे आडनाव 'कांबळी' असे घेण्यात आलेले आहे.) यांच्यासंबंधीची नोंद चरित्रात्मक असण्याऐवजी त्यांच्या 'राघववेळ' या कादंबरीचे समीक्षण एवढीच राहते. असो. कोशकार्याच्या अवाढव्य व्यापात कधीकधी काही गोष्टी संपादकांच्या क्षमतेच्या – आवाक्याच्या – बाहेर जातात हेच खरे. मुद्रिते तपासणे आणि ती तपासत असताना मूळ संहिता हाताशी ठेवून तपासणे हा एक स्वतंत्र कार्यकर्तृत्वाचाच भाग आहे. त्याबाबतीतही कित्येकदा संपादकांचा नाइलाज असतो. या नाइलाजाचीही उदाहरणे प्रस्तुत कोशात आढळतील.

हा विश्वचरित्र-कोश असल्यामुळे अनेकविध क्षेत्रातल्या, जगातल्या कर्तृत्ववान व्यक्तींसंबंधीच्या भरपूर माहितीने समृद्ध आहे. आपले विश्वासंबंधीचे ज्ञान किती तोकडे असते हे तर या प्रकारचे कोश वाचताना जाणवतेच; पण मानवतेच्या इतिहासात होऊन गेलेल्या विलक्षण, प्रतिभावान, कर्तृत्ववान माणसांचा परिचय होऊन मानवी संस्कृतीचे, जीवनव्यापारात विविध प्रकारे गुंतलेल्या मानवी मनांचे, प्रज्ञेचेही अनोखे दर्शन आपल्याला घडत जाते. मानवी जीवनाच्या विविध पैलूंचे, जीवनातील अनेकविध

क्षेत्रांचे, विश्वाचे रूप बदलू शकणाऱ्या मानवी कर्तृत्वाचे, आयुष्यात उद्‌भवणाऱ्या वेगवेगळ्या परिस्थितींचे आणि मानवी संस्कृतीच्या इतिहासाचे, आपली जीवनदृष्टी बदलून टाकणारे भान आपल्याला येते. वयाच्या कोणत्याही टप्प्यावर असे कोश वाचले तरी हरकत नाही; पण विद्यार्थीदशेतच जर ते वाचण्याचे संस्कार झाले तर त्यासारखे सुदैव नाही. या प्रकारचे प्रकल्प पूर्ण करण्याची जिद्द बाळगणारे श्री. कामत आणि त्यांचे सहकारी यांना या कार्याबद्दल धन्यवाद दिले पाहिजेत. वर उल्लेख केल्याप्रमाणे ७४० ज्ञानक्षेत्रांतील व्यक्तींसंबंधीच्या सुमारे चार हजार नोंदी या दोन खंडांद्वारे वाचकांसमोर आल्या आहेत. त्या त्या ज्ञानक्षेत्रातील तज्ज्ञ शोधून, त्यांच्याकडून लेखन करवून, साधने जमवून, हा प्रकल्प सिद्धतेला नेण्याचे महत्‌कार्य ते करीत आहेत, (त्यांतील अडचणींची आंशिक कल्पना असल्याने) त्यांचे विशेष अभिनंदनही करावेसे वाटते आणि पुढील खंडांसाठी शुभेच्छाही द्याव्याशा वाटतात. ■

**'कैवल्य', परिगणित वसाहत, काँगेसनगर रस्ता, अमरावती ४४४ ६०६.**

**लेखक-परिचय**

- **उमाकांत रामचंद्र कामत** - पालघर व पुणे येथील शालेय शिक्षणानंतर मुंबईला मराठी विषयात बी.ए.,एम्.ए.,बी.एड्. शिक्षक, प्राध्यापक, अलिगडच्या महाविद्यालयातून निवृत्त, 'महाराष्ट्र टाइम्स' व शैक्षणिक नियतकालिकांतून भाषाविषयक टिपणे, पुस्तक-परीक्षणे, इ० लेखन.
- **डॉ. द.भि. कुलकर्णी** - पीएच्.डी.(मराठी), रशियन भाषेतील पदविका, नागपूर विद्यापीठातून मराठीचे प्रोफेसर व विभागप्रमुख म्हणून निवृत्त. एकतीस प्रकाशित ग्रंथ. पीएच्.डी. पदवीसाठी २५ विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. अनेक पारितोषिके व सन्मानांचे मानकरी. मान्यवर शिक्षक.
- **विश्वनाथ खैरे :** केंद्रीय बांधकाम खात्यातून अभियंता म्हणून निवृत्त. संस्कृत, मराठी, तमिळ ('संमत') यांच्या आंतरसंबंधांचा विशेष अभ्यास. प्राचीन मिथ्यकथा, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांसंबधी लेखन.
- **डॉ. प्रभा गणोरकर** - कवयित्री, समीक्षक, एम्.ए.,पीएच्.डी.,विदर्भ महाविद्यालय (अमरावती) व एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई येथे मराठीचे अध्यापन. निवृत्तीनंतर अमरावती येथे वास्तव्य. 'व्यतीत' (१९७४) व 'विवर्त' (१९८५) हे काव्यसंग्रह. साहित्य अकादमीच्याा 'भारतीय साहित्याचे निर्माते' या मालेत 'कविवर्य बा.भ. बोरकर' हे पुस्तक, 'बोरकरांची निवडक कविता', 'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि वाङ्मय', 'किनारे मनाचे' (शान्ता शेळके यांची निवडक कविता), ही अन्य प्रकाशित पुस्तके. 'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोशा'चे सहसंपादन. 'कादंबरी : एक साहित्यप्रकार', व 'निबंध : एक वाङ्मयप्रकार' ही अभ्यासक्रमासाठी लिहिलेली पुस्तके.
- **डॉ. विनायक गंधे** - पीएच्.डी.(मराठी) गेली ३५ वर्षे डी.बी.जे. महाविद्यालय चिपळूण येथे पदवी व पदव्युत्तर स्तरावर मराठीचे अध्यापन. पीएच्.डी.साठी संशोधन-मार्गदर्शक (मुंबई विद्यापीठ), महाराष्ट्र राज्य पाठ्य-पुस्तक मंडळाच्या सध्याच्या दहावीच्या मराठीच्या पाठ्यपुस्तकाचे संपादक-सदस्य. विविध नियतकालिकांतून समीक्षालेखन. 'सोपानदेवी' (संत सोपानदेवांचे चरित्र), 'एकच प्याला समीक्षा-पर्व', आणि 'एकच प्याला : मराठी साहित्याचे वैभव' ही पुस्तके प्रकाशित.

(पुढील लेखक-परिचय पान क्र. ५१ वर.)

पुस्तक-परीक्षण

# राजभाषा मराठीचा सर्वांगीण विचार

दिलीप धोंडगे

[परीक्षित ग्रंथ : 'मराठी भाषा : स्वरूप आणि उपयोजन'. य.शं. कानिटकर, फडके प्रकाशन, कोल्हापूर, प्रकाशनवर्ष २००३, पृष्ठे ११२+१६, किंमत रु. ५०/-]

'मराठी भाषा : स्वरूप आणि उपयोजन' हे यशवंत शंकर कानिटकर यांच्या चौदा लेखांचे एकत्रीकरण असलेले पुस्तक आहे. सन १९७५ ते २००० या पावशतकाच्या कालखंडात विविध निमित्तांनी ते लिहिलेले आहेत. श्री. कानिटकर हे राज्याचे भाषा संचालक होते, या नात्याने त्या त्या वेळच्या शासकीय भूमिकांचे स्पष्टीकरण करण्याच्या निमित्ताने कानिटकरांनी जसे लिहिले आहे तसेच एक जबाबदार भाषाप्रेमी, मराठीभाषक विद्वान म्हणूनही लिहिले आहे.

या पुस्तकात जे लेख एकत्रित केले आहेत, त्यांची वर्गवारी चार भागांत करता येऊ शकते : भाषांतरविचार, परिभाषाविचार, शब्दविचार, राजभाषा मराठी आणि शासनव्यवहार यासंबंधीचा विचार. ('लोकमान्य टिळकांचा भाषाविचार' हा लेख या चारही भागांतील लेखांना लांधून जाणारा आहे.) भाषांतरविचाराशी संबंधित तीन लेख, परिभाषाविचाराशी निगडित तीन लेख, शब्दविचारासंबंधी तीन लेख, राजभाषा आणि शासनव्यवस्था यासंबंधीचे पाच लेख आहेत. परिभाषाविषयक लेखांत लेखकाची एक मुलाखत लेखरूपात आहे. एकाच स्थूल विषयाशी संबंधित शब्द आणि भाषा या अंगांनी विचार करणारे प्रत्येकी तीन व पाच सूक्ष्म लेख असल्यामुळे मजकुराची पुनरावृत्ती झालेली आहे. विविध नियतकालिकांत वेळोवेळी हे लेख प्रसिद्ध झालेले असल्यामुळे त्यांच्या सुट्या स्वरूपात पुनरावृत्ती जाणवण्याचे कारण नव्हते; पण ग्रंथगत झाल्यानंतर ही पुनरावृत्ती प्रकर्षाने लक्षात येते.

सन १९६०-६५च्या दरम्यान भारतातील बहुतेक राज्यांनी आपल्या प्रादेशिक भाषांना राजभाषांचा दर्जा देऊन सरकारी कामकाज त्या भाषांतून व्हावे अशी अपेक्षा ठेवली होती. त्याप्रमाणे मे १९६६ पासून महाराष्ट्रात मराठी ही अधिकृतपणे राजभाषा झाली. पण सरकारी कामकाज व्हावे तसे राजभाषांमधून होत नाही. हे मध्यवर्ती

सरकारच्या लक्षात आले म्हणून केंद्रशासनाने १९७८ साली सर्व संबंधितांची दिल्लीत एक बैठक बोलावली होती. त्या बैठकीत १९७९ हे वर्ष प्रत्येक राज्याने राजभाषा-वर्ष म्हणून साजरे करावे असे ठरले. या राजभाषावर्षात जे विविध कार्यक्रम झाले, त्यांत कानिटकरांना भाषा-संचालक या नात्याने सहभागी होणे आवश्यक होते; व 'अभ्यासोनि प्रगटावे' या पद्धतीने ते सहभागी झाले. त्या वर्षी त्यांनी शासनाचे मुखपत्र असलेल्या 'लोकराज्य' मासिकात ''राज्यव्यवहार व राज्यकारभारातील मराठी'' हा लेख लिहिला व 'किर्लोस्कर' मासिकासाठी ''परिभाषा कृत्रिम असणे अटळ आहे'' या विषयावर एक मुलाखत दिली. मात्र महाराष्ट्रात १९६१ साली म्हणजे महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेनंतर लगेचच भाषा सल्लागार मंडळाची स्थापना करण्यात आलेली होती व एक स्वतंत्र भाषिक विभाग निर्माण करण्यात आलेला होता. शासन व्यवहार कोश, प्रशासनिक लेखन, राजभाषा परिचय, प्रशासनिक वाक्यप्रयोग, वित्तीय शब्दावली, लघुलेखन व टंकलेखन मार्गदर्शिका इत्यादी प्रकाशनेही शासनाने प्रसिद्ध केलेली होती. याशिवाय प्रशिक्षण वर्ग भरविले होते. तरी मराठीच्या वापराचे प्रमाण ३० ते ३५ टक्क्यांच्या वर पोहोचले नव्हते. ही तत्कालीन वस्तुस्थिती ध्यानात घेऊन शासनाने एवढे प्रयत्न का फलद्रूप होत नाहीत याची मीमांसा करणे भाग होते. शासनाने प्रसिद्ध केलेल्या साहित्यावर त्या वेळी टीकेची झोडही उठविली गेली होती. उदाहरणार्थ, 'पदनाम कोशा'ची 'बदनाम कोश' अशी संभावना केली गेली होती. श्री. कानिटकर यांनी या एकंदर वास्तवाची चर्चा, चिकित्सा आणि मीमांसा केली आहे. पारिभाषिक संज्ञा या प्रारंभी क्लिष्ट, दुर्बोध किंवा असमान तरी वाटतात. त्याला इलाज नसतो. ज्या संज्ञा भाषेशी एकरूप होतात, त्या टिकतात; ज्या होत नाहीत त्यांना पर्यायी संज्ञा तयार केल्या जातात. या संदर्भात समाजाची सकारात्मक आणि स्वीकारशील वृत्ती मात्र हवी असे प्रतिपादन ते करतात. (पृ. ८७)

'भाषांतर', 'अनुवाद : स्वरूप व कार्य' आणि 'लीगल ट्रान्सलेशन ॲण्ड टर्मिनॉलजी' हे भाषांतरासंबंधीचे तीन लेख आहेत. स्वरूप आणि उपयोजन या उभयविध अंगांची व्यवस्थितपणे उकल करणारे हे लेख कानिटकरांच्या बहुश्रुततेचाही प्रत्यय देतात. 'भाषांतर' या लेखात ललित आणि ललितेतर साहित्याच्या भाषांतराची सोदाहरण चर्चा करताना सरस, नीरस भाषांतराबाबत आपले अभिप्रायही त्यांनी नोंदवले आहेत.

'परिभाषा : स्वरूप आणि समस्या', 'परिभाषा कृत्रिम असणे अटळ आहे ?' आणि 'लीगल, ट्रान्सलेशन...' या लेखांचा विचार पारिभाषिक संज्ञांबाबत एकत्रित करावा लागतो. विविध क्षेत्रीय अभिव्यक्तीसाठी भाषा सक्षम करायची असेल तर





अनुक्रमणिका

परिभाषानिर्मिती करावीच लागते. पण प्रारंभी अशी भाषा स्वीकारणे जड जाते. अखेरीस, त्या त्या भाषेला आपल्या जननी भाषेचा आधार घ्यावा लागतो व तिच्या व्याकरणिक अंत:सूत्रांद्वारा शब्द घडवावे लागतात. पण संस्कृत तत्सम पारिभाषिक संज्ञांची हेटाळणी केली जाते. इंग्रजीतला जडबंबाळ शब्द आनंदाने स्वीकारायचा व संस्कृत तत्सम शब्दाची हेटाळणी करायची यांत नकारात्मक वृत्तीचाच भाग असतो. इंग्रजीतल्या पारिभषिक संज्ञेला प्रति परिभाषिक संज्ञा तयार करताना तंतोतत सारखेपणा अवतरणार नसला तरी त्याचा फार बाऊ करण्यातही अर्थ नसतो. आपण शब्दपातळीपाशीच अडकून पडतो आणि वाक्यरचना या महत्त्वाच्या टप्प्याकडे आपले दुर्लक्ष होते. इंग्रजी वाक्यरचना व मराठी वाक्यरचना यांचा संरचनात्मक अभ्यास करून दिशा देण्याची गरज आहे.

'मराठी शब्दकोश रचना : स्वरूप व समस्या', 'भाषा व शब्दसाधना', 'ग्राम्यतेतील सामर्थ्य' या लेखांचा शब्दपातळीवर आणि कोशरचनेच्या संदर्भात विचार करावा लागतो. 'मराठी शब्दकोश रचना : स्वरूप व समस्या', हा लेख कोशवाङ्मयाचा इतिहास, शब्दकोशाचे प्रकार, क्रियापदाची नियमाप्रमाणे होणारी रूपे, उच्चारदर्शन, अर्थलेखन इ० अंगांनी सोदाहरण विचार करणारा बृहद् लेख आहे. 'भाषा आणि शब्दसाधना' या लेखात पर्यायी संज्ञांच्या निर्मितीबाबत खुला दृष्टिकोण स्वीकारून भाषा समृद्ध करण्याची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. 'ग्राम्यतेतील सामर्थ्य' हा लेख शब्दांचा वास्तव पातळीवरून विचार करण्याची सूचना करतो.

'शासन व्यवहारातील मराठीचे स्वरूप आणि समस्या', 'राज्यव्यवहार व राज्यकारभारातील मराठी', 'राजभाषा : कशी असावी ? कशी नसावी ?', 'राज्यकारभार मराठीतून का होत नाही ?', 'राजभाषेच्या प्रतिष्ठेचे काय ?' हे लेख 'राजभाषा आणि शासनव्यवस्था' या संदर्भात ध्यानात घ्यावे लागतात. या लेखांतून शासनाचे राजभाषा म्हणून मराठीला सुप्रतिष्ठित करण्याचे व संवर्धनाचे प्रयत्न यांचे सम्यक् दर्शन घडते. त्यात शासकीय पातळीवरच्या उणिवाही मांडल्या गेल्या आहेत. विधानमंडळाचे मराठीतून होणारे कामकाज सोडल्यास मंत्रालयीन विभागांचे व न्यायालयांचे काम, महापालिका, विद्यापीठे, निरनिराळे आयोग व महापालिका यांतून मोठ्या प्रमाणावर इंग्रजीचाच वापर होतो. याबाबत मराठी भाषा विकास संस्था स्थापन करण्यात यावी अशी सूचना कानिटकरांनी डॉ. अशोक केळकरांना अनुसरून केली आहे. अर्थात आज हा संदर्भ बदलला आहे. इंग्रजीऐवजी प्रादेशिक भाषांतून राज्यकारभार सुरू करण्यासाठी घटनेने १९५० साली घालून दिलेली १५ वर्षांची मुदत १९६५ साली संपल्यामुळे सर्व राज्यांप्रमाणे महाराष्ट्र राज्यानेही राजभाषा अधिनियम

१९६५ साली संमत केला. त्यानुसार मराठी ही महाराष्ट्राची राजभाषा झाली. पण इंग्रजीही अनिश्चित काळपर्यंत राजभाषा म्हणून चालू ठेवण्याची तरतूद केली गेली. परिणामत: इंग्रजीचा वरचष्मा हा कायमच राहिला. ही तरतूद रद्द होण्याची गरज कानिटकरांनी 'राज्यकारभार मराठीतून का होत नाही ?' या लेखात स्पष्ट केली आहे. आपला सर्वांगीण समाजव्यवहार मराठी भाषेतून झाल्याखेरीज मराठीची राजभाषा म्हणून प्रतिष्ठा जोपासली जाणार नाही हे कानिटकर आवर्जून सांगतात. यानिमित्ताने शासकीय पातळीवरच्या अनेक घडामोडींची ते तपशीलवार नोंदही करतात.

विशिष्ट काळ आणि परिस्थिती यांचे संदर्भ असलेले हे लेखन आजही विचार आणि कृतिप्रवण करणारे असल्यामुळे फार महत्त्वाचे आहे असे आवर्जून नोंदवावेसे वाटते. ■

**'कल्पलता', पी डी पी नगर, सटाणा, जि. नाशिक ४२३ ३०१.**

---

(लेखक-परिचय पान क्र. ४७वरून पुढे चालू...)

- **मंगला श्रीनिवास गोडबोले** - एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई येथे शिक्षण. नॅशनल स्कॉलर, दक्षिणा फेलो, वक्तृत्व-स्पर्धा पारितोषिके. मराठी व भाषाशास्त्र यांत एम्.ए. प्रथम वर्ग, प्रथम क्रमांक, १९७०. न.चिं. केळकर सुवर्णपदक. ४ वर्षे (१९८०-८४) 'स्त्री'मध्ये संपादन-साहाय्यक, १९८८पासून 'माहेर'मध्ये संपादन-साहाय्यक. ३६ प्रकाशित पुस्तके. त्यांत ११ कथासंग्रह, १ कादंबरी, ५ विनोदी लेखसंग्रह, १० ललित लेखसंग्रह आणि बालसाहित्य, माहितीपर साहित्य, अनुवाद इ०चा समावेश.शासनाचे ४, म.सा.प.चे ३ व इतर ६ असे एकूण १३ पुरस्कार. आकाशवाणीवरून भरपूर लेखन. एक नाटक व्यावसायिक रंगभूमीवरून सादर.
- **डॉ. विद्यागौरी टिळक** : जन्म १९६२. एम्.ए.,एम्.फिल्.,पीएच्.डी.(मराठी), सोमेश्वरनगर (जि.पुणे) येथे १९८६ ते १९९६ पर्यंत अध्यापन. १९९६पासून पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात प्रपाठक. कथा, कविता, लेख इ. स्फुट लेखन, प्रकाशित साहित्य : 'मराठी वाङ्मयाची सद्यस्थिती' (सहसंपादन), 'वाङ्मयेतिहासलेखन-स्वरूप आणि समस्या' (संपादन), 'समीक्षा-विविधा' (संपादन).
- **डॉ. ब्रह्मानंद देशपांडे** - महामहोपाध्याय, विद्याभूषण, प्राचीन मराठी वाङ्मयाचे व्यासंगी संशोधक. 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' इ० पुस्तके प्रकाशित.
- **डॉ. दिलीप धोंडगे :** सटाणा येथील कर्मवीर सोनवणे महाविद्यालयात मराठी विभागाचे प्रमुख. पीएच्.डी. प्रबंधास मु.श्री. कानडे पुरस्कार, संतपीठाचा रु. २५ हजाराचा महाबँक पुरस्कार व डॉ. व. दि. कुलकर्णी समीक्षा पुरस्कार. पुणे विद्यापीठाच्या ३ पाठ्यपुस्तकांचे संपादन. यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठासवाठी ५ पाठ्यपुस्तकांचे लेखन. मराठी अभ्यास परिषदेचा महाबँक पुरस्कार.
- **मो.वि. भाटवडेकर :** पोदार कॉलेज (मुंबई), भारत सरकारचा व्यापार व उद्योग विभाग, युनेस्को, एकॅफे, नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ बँक मॅनेजमेंट इ० संस्थांमध्ये सेवा, गांधर्व महाविद्यालयाच्या 'संगीत कलाविहार' या नियतकालिकाचे संपादन. 'मराठी पर्यायी शब्दांचा कोश' (साधना प्रकाशन) प्रकाशित. 'व्यावहारिक मराठी शब्दार्थकोश (राजहंस प्रकाशन) मुद्रणाधीत. वय ८७.

---

# 'मामा'

मो.वि. भाटवडेकर

माझे वय ८६ वर्षे. वार्धक्यामुळे येणाऱ्या व्याधीने गाठले. डॉक्टरांनी पृष्ठवंशरज्जूला सूज आल्याचे निदान केले. परिणामी मला हॉस्पिटलमध्ये दाखल करून गादीवर निजून राहण्याची शिक्षा फर्मावली. उपचार चालू असेपर्यंत मलमूत्रादीसाठी सुद्धा उठायचे नाही असे बजावून सांगून डॉक्टर निघून गेले.

काही वेळाने मला गरज लागली म्हणून मी घंटा वाजवली. आणि एक मध्यम वयाच्या बाई आल्या. त्यांनी ''काय हवे ?'' असे विचारले. मी त्यांना म्हटले, ''वॉर्डबॉयला पाठवा.''

त्यांच्या चेहऱ्यावर प्रश्नचिन्ह होते. तेव्हा मी चिन्हांकित भाषेचा उपयोग केला. आणि एक बोट दाखवून पुन्हा म्हटले. ''वॉर्डबॉयला पाठवा.'' तेव्हा त्यांना बोध झाला आणि त्यांनी मोठ्याने हाक मारली, ''अहो मामा, ८२० मध्ये युरीन पॉट द्या.'' आणि मामांकडून उत्तर आले, ''होय मावशी, आलो.'' आणि मग माझ्या लक्षात आले ज्याला आम्ही पूर्वी आया म्हणत असू. त्यांना आता मावशी म्हणतात, व 'वॉर्डबॉय'ला मामा म्हणू लागले आहेत. पुढच्या हॉस्पिटलच्या वास्तव्यात या लोकांची भाषा ऐकून आणि मला भेटायला येणाऱ्या नवीन लोकांवरून असे लक्षात आले की पूर्वी – म्हणजे ४० वर्षांपूर्वी – ज्यांना आम्ही शिपाई म्हणून संबोधित असू त्यांना आता मामा म्हणू लागले आहेत. ■

३, चैत्राली अपार्टमेंट्स, प्रभात रस्ता, गल्ली नं. ७, पुणे ४११ ००४.

---

**सार्थ शब्द**

शब्द म्हणजे नुसता अक्षराचा पुंजका नसतो. त्याला अर्थ असतो. त्यामागे संकल्पना असतात. त्याच्या पाठीशी एक अख्खी संस्कृती असते. आता उदाहरणार्थ 'इग्लू' घ्या. एस्किमो लोकांचे हे हिवाळ्यातलं घर म्हटल्यावर मराठीला ते ठाऊक असणं शक्यच नाही. तेव्हा त्या घराचं वर्णन करणारा सार्थ शब्द मराठीला स्वतः तयार करावा लागेल किंवा मग सरळ त्याला इग्लूच म्हणावं लागेल.

रवी आमले, 'मराठी भाषा आणि व... पण परंतु', 'रुची', दिवाळी, २००५, पृ. ८९.

---

# ईट्स, शूट्स अँड लीव्ह्ज

वाग्वैजयंती

मध्यंतरी एक विचित्र नावाचं पुस्तक पाहिलं. पुस्तकाचं नाव होते 'ईट्स, शूट्स अँड लीव्ह्ज्.' पुस्तकाचं उपशीर्षक होतं, 'द झीरो टॉलरन्स ॲप्रोच टु पंक्च्युएशन.' मलपृष्ठावर एक किस्सा लिहिलेला होता, तो असा : एक पांडा एका कॅफेमध्ये जातो. एक सँडविच मागवतो, खातो आणि बंदूक काढून हवेत गोळ्या झाडतो. बुचकळ्यात पडलेला वेटर त्याला कारण विचारतो. पांडा म्हणतो, 'मी पांडा आहे !' वेटर म्हणतो, 'असशील म्हणून काय झालं ?' पांडा वन्य जीवनावरचं एक माहितीपत्रक काढून त्याच्या अंगावर भिरकावतो. त्यात पांडा या प्राण्याच्या नावापुढं नोंद असते 'पांडा. अस्वलासारखा दिसणारा काळा पांढरा सस्तन प्राणी. ईट्स, शूट्स अँड लीव्ह्ज' लिहिणाऱ्याला लिहायचं होतं, की पांडा हा प्राणी कोवळ्या फांद्या आणि पानं खातो. पण चुकीच्या ठिकाणी स्वल्पविराम पडल्यानं, त्याच शब्दांचा अर्थ होतो, 'खातो गोळी मारतो आणि निघून जातो.' 'ईट्स, शूट्स अँड लीव्ह्ज' हे पुस्तक इंग्लिश भाषेच्या व्याकरणाविषयी नाही, तर केवळ विरामचिन्हांविषयी आहे. लेखिका लिन ट्रॉस हिला वृत्तपत्रातल्या स्तंभलेखनाचा आणि संपादनाचा दीर्घ अनुभव आहे. या आग्रही बाईनं बीबीसी रेडिओवर 'कटिंग अ डॅश' नावाची पंक्च्युएशनविषयी मालिका केली होती. या मालिकेवर आधारित हे पुस्तक आहे. लिन ट्रॉस म्हणते की विराचचिन्हं या काही निव्वळ खुणा नाहीत. ते विचार स्पष्ट असल्याचं लक्षण आहे. चुकीची विरामचिन्हं म्हणजे चुकीची वाक्यरचना, म्हणजेच पर्यायानं वैचारिक गोंधळ.

विरामचिन्हांची व्याख्या करताना लिन ट्रॉस म्हणते, 'विरामचिन्हं' ही ट्रॅफिक सिग्नल आहेत. विरामचिन्हं वाक्यातले शब्द एकत्र गुंफतात. त्यांची गती नियंत्रित करतात.' आपण तर काय; विरामचिन्हंच नाही, तर शब्दही चुकीचे वापरतो किंवा योग्य शब्द चुकीच्या पद्धतीनं लिहितो. वैचारिक गोंधळाचा यापेक्षा मोठा पुरावा तो काय पाहिजे ! स्वल्पविराम, पूर्णविराम, अर्धविराम, प्रश्नचिन्ह, उद्गारचिन्ह या सर्व चिन्हांचे अर्थ आणि उपयोग आपल्याला माहीत असतात. पण वापरताना मात्र आपण





अनुक्रमणिका

ही सगळी चिन्हं निष्काळजीपणे वापरतो. प्रश्नार्थक वाक्य असलं तरी सहजपणे पूर्णविराम देतो. अर्धविराम नक्की कुठं वापरायचा हे ठाऊकच नसतं आणि चुकीच्या स्वल्पविरामामुळं होणाऱ्या अर्थविपर्यासाविषयी तर बोलायलाच नको.

■

*दै. सकाळ, ८-५-०५*

---



## शंका...

नारायण मुकुंद पाटील

### हे रूप कसे तयार झाले ?

आपण बोलतांना आणि लिहितांना ''म्हणणे''चा वापर करतो, पण वाक्यांत मला 'म्हटले' या रूपाचा उपयोग करतो.

उदा० (१) कोणी म्हटले आहे ? किंवा (२) ज्योत्सनाने मकरंदला म्हटले की...

''म्हटले'' हे रूप कसे तयार झाले ?

मी माझ्या परीने याच्या शोधात आहे. पण मला याचे अजून स्पष्टीकरण मिळालेले नाही. आपण किंवा आपल्या वाचकांपैकी कोणी स्पष्टीकरण पुरवल्यास मी आभारी होईन. ■

८७१-१, पंडगाळ, शिरोडा, गोवा. संपर्क - २३०६५७१.

## ...आणि समाधान

विश्वनाथ खैरे

### संदर्भ : ''या संख्यांना नावे आहेत का ?''

भाषा आणि जीवन २४:१, पृ. ५६. मो.वि. भाटवडेकर यांची शंका अशी : ''परार्ध म्हणजे एकावर अठरा शून्ये दिलेली संख्या. अग्निहोत्रींच्या कोशानुसार अक्षौहिणी म्हणजे एकावर एकवीस शून्ये दिलेली संख्या. तर एकावर एकोणीस व वीस शून्ये दिलेल्या संख्यांची नावे काय ?''

एकावर जितकी शून्ये तितका तो 'दहाचा घात' असे म्हणतात. त्यामुळे शंभर म्हणजे दहाचा दोन घात (वर्ग, दहा गुणिले दहा) व परार्ध म्हणजे दहाचा अठरा घात. (दहा गुणिले दहा गुणिले... अठरा वेळा)








या रीतीने (अ.कोशानुसार) अक्षौहिणी म्हणजे दहाचा एकवीस घात आणि त्या संख्येचे मूल्य हजार परार्ध इतके होईल.

अक्षौहिणी ही संख्या महाभारतात सैन्याच्या गणतीसाठी वापरलेली आहे. मोनियर विल्यम्सच्या कोशानुसार, एक वाहिनी म्हणजे तीन चा सात घात; दहा वाहिनी म्हणजे एक आनीकिनी. एक आनीकिनी गज, एक आनीकिनी रथ, तीन आनीकिनी घोडे आणि पाच आनीकिनी पायदळ अशा दहा आनीकिनींची अक्षौहिणी होते. एकूण संख्या २,१८,७००. दहाचा पाच आणि सहा घात यांच्या मधे ही संख्या पडते.

महाराष्ट्र शब्दकोशात अक्षौहिणीचा हा अर्थ पहिला देऊन त्याचे अवतरणही दिले आहे. अग्निहोत्री कोशातला अर्थही क्र. २ वर दिला आहे; परंतु त्याच्या उपयोगाचे उदाहरण दिलेले नाही.

मोल्सवर्थ कोशात पहिला अर्थ 'अ हंड्रेड ट्रायलिअन' म्हणजे दहाचा वीस घात (शंभर परार्ध) असा आहे, आणि दुसरा अर्थ, चतुरंग सैन्य असा गोळाबेरीज दिला आहे, त्याचे नेमके परिमाण नाही.

या चार कोशांतील नोंदींची संगती कशी लावावी ? अक्षौहिणी हा शब्द संस्कृत आणि खूप जुना म्हणून त्याचा मूळ अर्थ संस्कृतवरूनचा प्रमाण धरला पाहिजे. हजार किंवा शंभर परार्ध एवढे मोठे मूल्य सांगणारा अर्थ लोकांच्या बोलण्यातून मोल्सवर्थच्या माहितीकारांनी नोंदलेला असावा. महाराष्ट्र शब्दकोशात या दुय्यम अर्थातल्या शून्यांची संख्या नोंदण्यात कदाचित गडबड झाली असेल. किंवा संस्कृत अर्थातल्या एकवीस या प्रारंभीच्या आकड्यामुळे ती संख्या शून्यांची म्हणून नकळत आली असेल. अग्निहोत्रींच्या कोशातली नोंद उघडच महाराष्ट्र शब्दकोशावरून घेतलेली दिसते; पण ती एकटीच असली तर 'हा त्याचा मराठी बोलण्यातला अर्थ' असे समर्थन मानावे लागेल.

काही असले तरी मोठ्या संख्यांचे मान्य परिमाण म्हणून अक्षौहिणी प्रचारात नाही हे (अग्निहोत्रींच्या परार्धान्त यादीवरूनही) उघड आहे. असे म्हणण्याला गणितशास्त्रीय आधार भास्कराचार्यांच्या लीलावतीचा आहे. तिच्यातील संख्यास्थाननिर्णय श्लोक १०-११मध्ये दशगुणोत्तर संज्ञा, दहाचा अठरा घात अशा परार्धापर्यंतच दिल्या आहेत. त्यामुळे परार्ध आणि अक्षौहिणी यांच्या मधल्या दोन परिमाणांची नावे बहुधा कोठे सापडणार नाहीत.

तरी अतिशयोक्तीच्या बोलण्यात किंवा पुराणकथांच्या रचनेत वाटेल तेवढ्या मोठ्या संख्या वापरणारांचे तोंड किंवा हात कोण धरणार ? याचे चांगले उदाहरण वाल्मीकिरामायण युद्धकांड सर्ग २८ (गीताप्रेस प्रत) यात आहे. शुक्र नावाचा रावणाचा

दूत रामाच्या सैन्याची पाहणी करून परत गेल्यावर रावणाला वानरांच्या संख्येची कल्पना देतो. त्यासाठी तो आधी या मोठ्या परिमाणांची यादीच वाचतो. शतसहस्रांच्या (दहाच्या नव्हे) पटीने तो संख्यांची गणती करतो. ''शंभर शतसहस्र (दहाचा सात घात) म्हणजे कोटी, शतसहस्र कोटी म्हणजे शंकु'' अशी सुरुवात करून'' ...शतसहस्र महाशंकूला वृन्द म्हणतात... शतसहस्र ओघ म्हणजे महौघ'' असा शेवट करतो. वृन्द म्हणजे दहाचा बावीस घात आणि महौघ म्हणजे दहाचा साठ घात अशी ही परिमाणे आहेत. यापुढे तो वानरांची संख्या सांगतो ती दहाचा सदुसष्ट घात इतकी मोठी आहे. इतकी वानरे दाटीवाटीने उभी राहायला देखील एक लंका सोडाच, लक्षावधी पृथ्वीसुद्धा पुरणार नाहीत !

शुक्राने रामरावणयुद्धातल्या वानरांची संख्या फुगवली. कौरव-पांडवांच्या लढाईच्या कथा ऐकणाऱ्या मराठमोळ्यांनी 'अक्षौहिणी'लाच परार्धाच्या पुढचे परिमाण करून त्यातल्या सैन्याची संख्या अशीच मोठी केली.

■

३७४, सिंध सोसायटी, औंध, पुणे ४११ ००७.

## शब्द आणि त्यांचे अर्थ

आज आपण समाजात (मानव समाज) वावरताना भाषेतील कोणत्या शब्दांचे मूळ आणि खरे अर्थ कायम ठेवले आहेत ? मारून टाकण्यासाठी मैत्री केली जाते; चिरडून टाकण्यासाठी चर्चेचा आव आणला जातो; आक्रमणाला हक्काचा मुलामा दिला जातो; दडपून टाकण्यासाठी दान दिले जाते; करारनाम्यांनी गळे कापण्याचा मार्ग मोकळा केला आहे. स्नेहासाठी हातात हात घेतानाच पायाखाली सुरुंग पेरले जातात; सैतानाला साम्यवादी म्हणून गौरविले जाते आणि डोंगराएवढ्या चुकांना 'विकसनशील भवितव्याचे टप्पे' असे संबोधण्यात येते; कोणत्या शब्दांना आपण त्यांचे मूळ अर्थ कायम ठेवले आहेत ?

**अनिल पं. कुलकर्णी**

दै. लोकसत्ता, १९-२-२००६








## प्रतिसाद

१ **द.भि. कुलकर्णी**

डॉ. पुंडलिकांनी दिलेल्या संदर्भ-ग्रंथात डॉ. ग.त्र्यं. देशपांडे यांच्या ग्रंथांचा निर्देश नाही; त्या ग्रंथांकडे त्यांनी लक्ष दिले असते, तर त्यांच्या आकलनाचा मोहरा बदलून गेला असता ! ■

**डीएसके विश्व, 'वसुधा', ई-००४, ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे ४११ ०४१.**

२ **राजीव नाईक**

'भाषा आणि जीवन'च्या हिवाळा २००६च्या अंकात 'अर्थनिर्धारणाचे पाच आयाम' हा श्री. शैलेश सदाशिव पुंडलिक ह्यांचा लेख आला आहे. त्यात शेक्स्पिअरच्या हॅम्लेटमधली चार (अर्ध) अवतरणं आहेत. त्या सर्वांत चुका आहेत. मुळात ती अशी आहेत :

(१) ''O ! that this too too solid flesh would melt,/ Thaw and resolve itself into a dew;'' (I.2.129-130)

(२) ''There are more things in heaven and earth, Horatio,/Than are dreamt of in your philosophy.'' (I.5.166-167)

(३) ''- Alas ! poor Yorick. I knew him, Horatio; a fellow of infinite jest, of most excellent fancy;'' (V.1.177-178)

(४) ''What a piece of work is a man !'' (II.2.303-304)

(सर्व संदर्भ अंक - प्रवेश-पंक्तीसंख्या ह्या क्रमाने दिले आहेत.)

पाठभेदांमुळे ही अवतरणं अशी छापली गेली असं वाटत नाही. ■

**३५, कलानगर, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१. दूरध्वनी : २६५९०७४४**










## ३ मो.वि. भाटवडेकर

संदर्भ : 'भाषा आणि जीवन' हिवाळा २००६ (वर्ष २४, अंक १) या अंकातील माझे टिपण.

ह्या संदर्भात मला एकूण चार, भरपूर माहिती देणारी पत्रे आली. पण एकावर १९ शून्ये व एकावर २० शून्ये या दोन संख्यांना काय म्हणतात, यावर कोणीही काही माहिती दिलेली नाही. मात्र एका पत्रामुळे अग्निहोत्रींच्या कोशातील एका विसंगतीकडे लक्ष गेले. म्हणून हे पत्र.

बेळगावचे श्रीयुत गर्ग यांनी परार्ध म्हणजे ''एकावर १८ शून्ये नव्हेत तर एकावर १७ शून्ये'' असे लिहिले म्हणून मी अग्निहोत्रींचा कोश उघडून परिशिष्ट पुन्हा पाहिले त्यात परार्ध म्हणजे एकावर अठरा शून्ये दिली आहेत. मात्र कोशाच्या तिसऱ्या खंडात परार्ध या शब्दाचा अर्थ दिला आहे, तेथे परार्ध म्हणजे ''एकावर १७ शून्ये दिली असता होणारी संख्या'' असे म्हटले आहे ! ■

**३, चैत्राली अपार्टमेंट, प्रभात रस्ता, ७वी गल्ली, पुणे ४११ ००७.**

## ४ डॉ. माणिक धनपलवार

अंदाजपंचे धागोदरसे : ''भाषा आणि जीवन', दिवाळी २००४ (ऑक्टोबर)च्या अंकात प्रा. प्र.ना. परांजपे यांनी संपादकीयात 'अंदाजपंचे धागोदरसे' या वाक्प्रचाराचा उल्लेख केला आहे. तो कुठल्या संदर्भात वापरला गेला हे स्पष्ट नाही. पण त्याचा अर्थ – 'तर्काने किंवा अनुमानधपक्याने एखाद्या चुकीच्या निष्कर्षावर येणे' हा असावा. तसे जर असेल तर हा वाक्प्रचार कसा रूढ झाला असावा ते पाहू.

'अंदाजपंचे धागोदरसे' हे 'अंदाजपंचे दाहोदरसे' यावरून सिद्ध केलेले दिसते. आणि ह्याचे 'बावीसपंचे दाहोदरसे' (२२ × ५ = ११०) या उजळणीच्या पाढ्याशी साम्य आहे. पाच-पन्नास वर्षांपूर्वी उजळणीचे पाढे अशाच पद्धतीने म्हटले जात. उदा० तेरंदाही तिस्तोरासे (१३०), पंधरंदाही पनावरसे (१५०), बारंदाही बारोदरसे (१२०) इत्यादी. यातील 'से' म्हणजे 'शे', 'शेकड्याचा म्हणजे शंभर या आकड्याचा निदर्शक



अनुक्रमणिका








आहे. उपरोक्त वाक्प्रचारात बावीस या आकड्याचा जो उपयोग करावयाचा तो न करता 'अंदाज' या शक्यतादर्शक शब्दाचा उपयोग केल्यामुळे त्यास विविक्षित अर्थ प्राप्त झाला आहे.

दौलताबाद : डॉ. सुमन बेलवलकरांनी गं.ना. जोगळेकरलिखित 'मराठी भाषेचा इतिहास' या पुस्तकाचे परीक्षण केले आहे, त्यात मराठवाड्यातील औरंगाबादपासून जवळ असलेल्या दौलताबाद (देवगिरी) या ग्रामनामाच्या पूर्वशब्दरूपाविषयी लिहिले आहे. कुव्वत-उल-इस्लाम → कुत्बाबाद → दौलताबाद – असे नामरूप सिद्ध झाल्याचे त्यांनी म्हटले आहे. प्रश्न असा की 'कुत्बा'चे 'दौलता' यात कसे रूपांतर होईल ? 'क'चे 'द' असे भाषाशास्त्रदृष्ट्या होणार नाही. खरे म्हणजे येथे लेखिकेस 'खुल्दाबाद' हे रूप अभिप्रेत असावे. औरंगाबादहून दौलताबादेस जाताना वाटेत 'खुल्दाबाद' हे छोटेसे गाव लागते. औरंगजेबाची येथे कबर असल्यामुळे या गावास प्रसिद्धी मिळाली आहे. एरव्ही हे गाव कुणाच्याही लक्षात येण्यासारखे नाही. कुसुमाग्रजांची एक कविता याच खुलदाबादवर आधारित आहे. ■

५ श्रीधर वि. सहस्रबुद्धे

शब्दांचे अर्थ आणि उपयोग कसे बदलत जातात हे पाहण्यासारखे असते, नाही? नुकतेच त्र्यं. वि. पर्वते यांचे मुलाखतींचे पुस्तक (१९४३) वाचले. त्यात रँगलर परांजप्यांनी सावरकरांची फर्गसनच्या वसतिगृहातून हकालपट्टी केली त्या संदर्भात सावरकरांचे वर्तन '*उच्छृंखल*' होते असे म्हटले आहे. आज 'उच्छृंखल' शब्द प्रामुख्याने मुलींची छेडछाड काढण्याच्या संदर्भात वापरला जातो. (मतभेद निश्चित). आणखी शब्द : *बलात्कार.* केवळ बळजबरी, सक्ती यासाठी वापरला जाणाऱ्या या शब्दाने केवढे भव्य दिव्य (!) रूप धारण केले आहे.

तेव्हा अशी अर्थान्तराची प्रक्रिया कशी होते यावर चर्चा व्हावी. ■

१९५४, सदाशिव पेठ, माडीवाले कॉलनी, पुणे ४११ ०३०.








## भाषाविषयक लेखनाची (पुरवणी) सूची : २००५

सुषमा पौडवाल

### १. पुस्तके :

**बिनीवाले**, अविनाश/'फ्रेंच भाषेचा श्रीगणेशा'/ विरार, मुद्रा प्रकाशन/पृ.५२/ रु. ३०/-

फ्रेंच भाषा संभाषणाचा वाटाड्या

### २. लेख :

**कर्णी**, मृदुला/'उत्तम शिक्षणासाठी भाषा-विकास'/सकाळ, २२ नोव्हेंबर/पृ.४

**कुलकर्णी**, उदय/ 'माय मराठी'/साप्ताहिक सकाळ/२४ सप्टेंबर/पृ.१४-१५

**केळकर**, अशोक/'भाषाच शत्रू आणि भाषेचे शत्रू'/सकाळ/३ जुलै, पुरवणी/पृ.१

**गोगटे**, म.ना./'इंग्रजी-हिंदीचे आक्रमण की आमंत्रण'/सकाळ/१४ ऑक्टोबर/पृ.४

**गोडबोले**, मंगला/'' 'मराठी'चे मित्र''/ सकाळ/२३ ऑक्टोबर, पुरवणी/पृ. ४

**घाटे**, निरंजन/'मानवी वर्तणुकीचे वर्णन करणारे शब्द'/अनुभव/ऑक्टोबर/पृ. ४९-५३

**टिकेकर**, अरुण/'आधी भावाविष्कार, मग शब्दाविष्कार, मगच शब्दकोश'/ सकाळ/३० ऑक्टोबर/पुरवणी/पृ. ३

**ठोंबरे**, अनघा/'आनंदमय मराठी दिन'/ सकाळ/१२ मार्च, पुरवणी/पृ. ७.

**दाते**, शं. रा./'शुद्धलेखनाला पर्याय नाही' सकाळ/२३ जुलै/पृ. ४.

**दाणी**, अ.पां./'इंग्रजी भाषाशिक्षणाची स्थिती'/सकाळ/४ जून/पृ. ४

**दिवाण**, वृंदा/'आघाती शब्द'/सकाळ/४ जुलै/पृ. ४

**दुभाषी**, पद्माकर/'भाषिकप्रश्नी समंजपणाची गरज'/सकाळ/२९ डिसेंबर/पृ. ५

**देशपांडे**, गो.पु./'गरीब बिचारे शब्द'/ साप्ताहिक सकाळ/१८ जून/पृ.२५-२६

--- /'मराठी काय चोरापासून झाली ?' साप्ताहिक सकाळ/१ जानेवारी/पृ.४-५

**नाईक**, सुरेश स./'मराठीच्या मुळावर घाव घालण्याची खेळी'/सकाळ/२४ एप्रिल/पुरवणी/पृ. ३

**परळीकर**, स.म./'भारतीय भाषा संरक्षण दिन हवा'/सकाळ/१४ सप्टेंबर/पृ.४

--- 'हिंदी हीच राष्ट्रभाषा'/सकाळ/१२ नोव्हेंबर/पृ. ४

**पाटील**, इरगोंडा/'प्रादेशिक भाषांचे भवितव्य'/सकाळ/७ जून/पृ. ४

**बुरटे**, प्रकाश/'संमेलनाने भाषिक विद्वेष पसरवू नये !'/महाराष्ट्र टाइम्स/२८ डिसेंबर/पृ. ६








मराठे, ह.मो./'कुलभाषा'/सकाळ/९ ऑक्टोबर/पुरवणी/पृ. ७

मेंडजोगी, विजयकुमार/'सुंदर हस्ताक्षराची गरज'/सकाळ/२५ जुलै/पृ. ४

राजगुरू, माधव/'न्यूनगंड गेला; मराठीचे काय ?'/सकाळ/३० मे/पृ. ४

--- 'शुद्धलेखनाचे नियम सोपे हवेत' सकाळ/१२ जुलै/पृ. ४

वाग्वैजयंती/'आम्हा घरी धन'/सकाळ/२७ फेब्रुवारी/पुरवणी/पृ. ४

---'मराठी असे'/सकाळ/८ मे/पुरवणी/पृ. ७

--- 'शब्दांच्या सावल्या'/सकाळ १३ मार्च/पुरवणी/पृ. ४

---'संपादकीय'/मुं.सकाळ/२१ मे २००५/पृ. ४

सुर्वे, नंदा/'मराठीचा प्रभाव अबाधित ठेवा'/सकाळ/१५ नोव्हेंबर/ पृ. ४

## ३. टिपणे :

अनसिंगकर, सतीश/'अन्य भाषा शिकणे महत्त्वाचे'/सकाळ/१ डिसेंबर/पृ. ४

कडेपूरकर, हर्षवर्धन/'मराठीचा निकाल सुधारण्यासाठी'/सकाळ/३ जुलै/पुरवणी/पृ. ६

कर्वे, प्रभाकर/'परप्रांतीयांचा लोंढा व मराठी भाषक'/सकाळ/१७ डिसेंबर/पृ. ४

काळपांडे, वसंत/'शुद्धलेखनाचे नियम बदलावेत'/सकाळ/३ जुलै/पुरवणी/पृ. १

---- 'मंडळ निर्णय लादणार नाही'/सकाळ/२३ ऑक्टोबर/पुरवणी/ पृ. ४

काळे, अलका/'भाषा शिकवा'/सकाळ ३ जुलै/पुरवणी/पृ. ६

कुळकर्णी, सलील/'भाषा सोपी करणे हा उपाय नाही'/सकाळ/२० ऑक्टो./पृ. ४

दाते, श.रा./'भाषा म्हणजे पोरखेळ नव्हे'/सकाळ/२३ ऑक्टो./पुरवणी/पृ. ५.

नाईक, चित्रा/'दोष' शिक्षणपद्धतीचाच' सकाळ/३ जुलै/पुरवणी/पृ. १

पाटील, कपिल/'लोकभाषा तयार करणे गरजेचे'/सकाळ/३१ जुलै/पृ. ४

मराठे, श्रीराम/'मराठी प्रतिशब्द शोधणे गरजेचे'/सकाळ/३० डिसेंबर/पृ. ४

---- 'मायबोलीत न्याय'/सकाळ/२४ डिसेंबर/पृ. ४

## ४. मुलाखती :

सानिया/'भाषा जोपासण्याची जबाबदारी'/मुलाखतकार - नीला शर्मा/सकाळ/१२ जून/रविवार सप्तरंग पुरवणी/पृ. ३

## ५. भाषणे :

मेश्राम, केशव/'मराठी भाषा कधीही मरणार नाही'/सकाळ/२९ जानेवारी/पृ. ४

----'गेले द्यायचे राहून'/सकाळ/२९ जानेवारी/पृ. ४

## ६. पुस्तक-परिचय व परीक्षणे :

(इंडिया ऑफिसमधील हस्तलिखित प्रतीवरून तीस वर्षांनी प्रकाशित) 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण'/संपा.अ.का.प्रियोळकर/ सकाळ/ ३ जुलै/पुरवणी/पृ. २

उत्पात, वसंत/'मराठीचे सौष्ठव'/सकाळ/ ३ जुलै/पुरवणी/पृ. २

गुंडी, नीलिमा/'मराठीच्या परिवर्तनाचे निरीक्षण' (गं.ना.जोगळेकर : मराठी भाषेचा इतिहास)/सकाळ/१० एप्रिल/ पुरवणी/पृ. ७

देव, विजया/'क्षात्रबोलीचा अभ्यास' (दत्ता वाळवेकर : क्षात्रबोली)/सकाळ/१७ एप्रिल/पुरवणी/पृ. ७

शेणई, सुजाता/'भाषाशिक्षकाची निरीक्षणे/ सकाळ/३ जुलै/ पुरवणी/पृ. ७

## ७. पत्रव्यवहार :

खोपडे, शिवाजी र./'औषधांवरील नावे मराठीत असावीत'/सकाळ/२ एप्रिल/ पृ. ४.

गोरे, अनिल/'मराठी शब्दांचा आवर्जून वापर हवा'/सकाळ/२ एप्रिल/पृ. ४

गोरे, स्नेहा/'मराठीचा वापर व्हावा' सकाळ/१३ जुलै/पृ. ४

दळवी, रामकृष्ण/'हिंदीच्या प्रभावाला लगाम घाला.'/सकाळ/१९ नोव्हेंबर/पृ. ४

देवधर, विजय/'संगणक प्रणालीचा वापर मराठी भाषाशुद्धीसाठी हवा'/सकाळ/ १४ जुलै/पृ. ४

देशमुख, वसंत/'दुबळ्या वृत्तीमुळे मराठीला धोका'/सकाळ/ ५ नोव्हेंबर/पृ. ४.

नखाते, सुनीता/'शुद्ध मराठीसाठी एवढे तरी करा'/सकाळ/२२ नोव्हेंबर/पृ. ४

पाटील, इरगोंडा/'मुले नापास का होतात?'/सकाळ/१० जुलै/पुरवणी/ पृ. ७

पिंपरीपेंढारकर, तु.भ./'मराठीतून संवाद साधावा'/सकाळ/५ नोव्हेंबर/पृ. ४

राईरीकर, अपर्णा/'भाषाध्यापन महत्त्वाचे !'/सकाळ/१० जुलै/सप्तरंग पुरवणी/पृ. ७

राजे, चंद्रशेखर/'भाषाशुद्धतेचा आग्रह हवा'/सकाळ/१५ जानेवारी/पृ. ४

रेगे, बापूसाहेब / 'शिक्षकांनी गुरू व्हायला हवंय'/सकाळ/१० जुलै/रवि. सप्तरंग पुरवणी/पृ. ७

लांजेकर, रवी/'मराठी शिकणे आवश्यक'/सकाळ/१४ जून/पृ. ४.

सोमण, शलाका/''माझी मायबोली प्रकल्प''/सकाळ/१० जुलै/रवि. सप्तरंग पुरवणी/पृ. ७

## ८. प्रतिक्रिया/मतमतांतरे :

-- -- 'शुद्धलेखन'/सकाळ/२३ ऑक्टोबर/पुरवणी/पृ. ५

१२ ब, शततारका, चार बंगला, अंधेरी (प.), मुंबई ४०० ०५३

# लेखकांसाठी महत्त्वाच्या सूचना

१. लिखाण हस्तलिखित असो की टंकलिखित, ते कागदाच्या एकाच बाजूस सुवाच्च असावे. ओळींमध्ये व लिखाणाच्या चारही बाजूला व्यवस्थित अंतर ठेवावे. लेखात इंग्रजी अवतरणे असल्यास त्यांचे मराठी भाषांतरही द्यावे. व्यक्तींची, ग्रंथांची नावे, लेखांची शीर्षके, पारिभाषिक संज्ञा इ० देवनागरी लिपीत लिहावे. अतिशय अपरिहार्य असेल अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा. लिखाणाच्या शीर्षकानंतर लेखकाने स्वत:चे नाव लिहावे. लिखाणाच्या शेवटी, थोडी जागा सोडून, पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता (पिनकोडसह) लिहावा. नावातील आद्याक्षरे मराठी लेखनपद्धतीप्रमाणे द्यावीत. लिखाणाची भाषा शक्यतो सोपी व नेमकी असावी. पुनरुक्ती, अनावश्यक शब्दयोजना, क्लिष्ट वाक्यरचना टाळावी. लिखाणासोबत स्वतंत्र कागदावर स्वत:चा परिचय (शिक्षण, व्यवसाय, प्रकाशित लेखन इ०) थोडक्यात द्यावा. दूरध्वनी क्रमांक (संकेतक्रमांकासह) द्यावा.

२. संदर्भ देण्याची नवी, सोयीस्कर व जागेचा अपव्यय टाळणारी पद्धत पुढे दिली आहे. या पद्धतीचाच आपल्या लेखात उपयोग करावा : लेखात ज्या ठिकाणी संदर्भ द्यावयाचा असेल तेथे कंसामध्ये संबंधित पुस्तक/लेखकाचे नाव द्यावे आणि त्यापुढे संदर्भित पुस्तक/लेखाचे प्रकाशनवर्ष द्यावे. त्यानंतर, आवश्यक असल्यास, स्वल्पविराम देऊन पृष्ठक्रमांक लिहावा व कंस पुरा करावा. संदर्भातील सर्व तपशील लिखाणाच्या अखेरीस संदर्भसूचीमध्ये द्यावेत.सूचीतील प्रत्येक नोंदीतील तपशीलांचा क्रम साधारणपणे असा ठेवावा : लेखकाचे आडनाव, स्वल्पविराम, नावांची आद्याक्षरे, प्रकाशनवर्ष, ग्रंथाचे शीर्षक, पूर्णविराम, प्रकाशनसंस्था, स्वल्पविराम, प्रकाशनस्थळ, पूर्णविराम. **संदर्भसूची मराठीच्या अकारविल्हे असावी.**

३. पुढील विषयासंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे :
मराठी व अन्य देशीविदेशी भाषा (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ०) भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती.

- सौ. उषा ना. कुलकर्णी, नवी मुंबई यांनी 'मराठी अभ्यास परिषदे'ला रु. २५,००० - देणगी दिली आहे. त्यांनी आपली कन्या कै. डॉ. सुनीता जोशी हिच्या स्मरणार्थ ही देणगी दिली आहे. डॉ. सुनीता जोशी या खानापूर (जि. बेळगाव) येथे मराठीच्या प्राध्यापिका होत्या. त्यांचा 'आत्मरंग' हा काव्यसंग्रह आणि 'इंदिरा संत यांची कविता' हा समीक्षाग्रंथ अशी दोन पुस्तके प्रकाशित झाली आहेत.
- रमेश सा. भंडारी, पुणे यांनी त्यांच्या वडिलांचे (कै. सा.रा. भंडारी) स्मरणार्थ 'मराठी अभ्यास परिषदे'ला रु. ५०१/- देणगी दिली. रौप्यमहोत्सवी वर्षात संस्थेला मिळालेल्या या देणग्यांबद्दल संस्था कृतज्ञ आहे. ■

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/-, व्यक्तीला रु. १००/-, पंचवार्षिक वर्गणी रु.४५०/- परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'भाषा आणि जीवन'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** पाठवल्यास आपला पत्ता न विसरता लिहावा. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये २०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **मागील अंक :** 'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/ - आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

(५) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु.२,५००/-, अर्धे पान रु.१,५००/-, पाव पान रु.८००/-, शुभेच्छा रु.४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**मुखपृष्ठासंबंधी :** दृक्‌कलेच्या रचनेसाठी अत्यावश्यक असणारा एक घटक : आकार या वर्षी मुखपृष्ठांसाठी वर्तुळ, त्रिकोण आणि चौरस या तीन मूलभूत आकारांच्या रचनेत लिपीचा अविभाज्य घटक असलेल्या अक्षराच्या उपयोजनातून साकारलेली संकल्पना वापरली आहे. या रचनेतील अक्षरे भारताच्या समृद्ध लिपीसंस्कृतीचे प्रतिनिधीत्व करणारी असून संपूर्णपणे संगणकसाह्याने घडलेली आहेत. प्राधान्य अर्थातच देवनागरीला असून अन्य रचनांमध्ये बंगाली, मल्याळम आणि गुजराती अक्षरांचा उपयोग केला आहे.

चित्रकल्पना व अक्षर-निर्मिती : विनय सायनेकर; दृश्य संकल्पना व संगणकसाहाय्य : सुप्रिया खारकर. रेखाटन : वसंत आबाजी डहाके

---

अनुक्रमणिका

बुकपोस्ट - बुकपॅकेट - त्रैमासिक

R. N. I. नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३



प्रेषक

**कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद**

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र.५

वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. (दू. क्र. २४४८६०१५)

